महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायत (आकाश-चिन्हे (स्काय साईन) व जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन आणि नियंत्रण) मार्गदर्शक तत्वे, २०२३.

**महाराष्ट्र शासन**
**नगर विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांक : पीएमसी-३०१०/प्र.क्र.३९४(भाग-२)/नवि-२२**
मंत्रालय, मुंबई-४०० ०३२
दिनांक : २२ जून, २०२३

**संदर्भ** :- (१) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्रं.याचिका-३०१७/प्र.क्र.१३०/नवि-२२, दि.१८.०२.२०१७
(२) नगर विकास विभाग, शासन निर्णय क्र.याचिका-३०१७/प्र.क्र.१३०/नवि-२२, दि.१४.११.२०२२
(३) नगरपरिषद संचालनालय यांचे क्र.नपप्रसं-२०१५/ पी.आय.एल.क्र.११५/२०२१/ प्र.क्र.०३/ कक्ष १०/२५८८, दि.१०.०८.२०१८ रोजीचे पत्र.

**प्रस्तावना :-**

नगरपरिषद व नगरपंचायत क्षेत्रातील आकाश चिन्हे (स्काय साईन) व जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन व नियंत्रण करण्याच्या हेतूने सर्व समावेशक धोरण तयार करण्याचे आदेश मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी जनहित याचिका क्र.१५५/२०११ या प्रकरणी दिनांक ३१ जानेवारी, २०१७ रोजी दिले होते. सदर आदेशाच्या अनुषंगाने नगरपरिषद व नगरपंचायत क्षेत्रातील आकाश चिन्हे व जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन व नियंत्रण करण्याच्या अनुषंगाने स्वतंत्र मार्गदर्शक तत्वे तयार करण्याची बाब शासन स्तरावर विचाराधीन होती.

**शासन निर्णय:-**

आयुक्त तथा संचालक, नगर परिषद संचालनालय यांचेकडून संदर्भाधीन क्र.३ च्या पत्रासोबत नगरपरिषद व नगरपंचायत क्षेत्रातील आकाश चिन्हे(स्काय साईन) आणि जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन व नियंत्रण करण्याच्या हेतूने तयार केलेला मार्गदर्शक तत्वांचा मसूदा शासनास प्राप्त झाला आहे. सदर मसूद्याच्या आधारे मार्गदर्शक तत्वे तयार करण्यात आली असून, त्यास या शासन निर्णयान्वये शासनाची मान्यत देण्यात येत आहे. सोबत परिशिष्ट “अ” मध्ये मराठी व परिशिष्ठ “ब” मध्ये इंग्रजी मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात आलेली आहेत.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२३०६२२१८१८२९२२२५ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: CN = C PRIYANKA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.06.22 18:19:44 +05'30'

**( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )**
**उप सचिव, महाराष्ट्र शासन**

**प्रत,**

१. मा.मुख्यमंत्री यांचे अपर मुख्य सचिव, मंत्रालय, मुंबई
२. प्रधान सचिव (नवि-२), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई
३. आयुक्त तथा संचालक, नगरपरिषद प्रशासन संचालनालय, मुंबई
४. सर्व विभागीय आयुक्त
५. सर्व जिल्हाधिकारी
६. सर्व मुख्याधिकारी, सर्व नगरपरिषद व नगरपंचायत, महाराष्ट्र राज्य
७. सहायक सरकारी वकील, उच्च न्यायालय, मुंबई
८. निवडनस्ती-नवि-२२.

# परिशिष्ट "अ"

## १. सर्वसाधारण

(१) या मार्गदर्शक तत्वांना, "महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायत (आकाश-चिन्हे (स्काय साईन) व जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन आणि नियंत्रण) मार्गदर्शक तत्वे, २०२३" म्हणून संबोधण्यात येईल.

(२) ही मार्गदर्शक तत्वे, महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायती व औद्योगिक नागरी अधिनियम १९६५ चे कलम ३४१ (अ) (१) या अन्वये स्थापन केलेल्या आणि घटित केलेल्या सर्व नगरपरिषदा व नगरपंचायतीच्या क्षेत्रांना तसेच यापुढे स्थापन होणाऱ्या सर्व नगरपरिषदा व नगरपंचायतीच्या क्षेत्रांना लागू असतील.

(३) ही मार्गदर्शक तत्वे पारित करण्याच्या दिनांकापासून अंमलात येतील.

## २. <u>व्याख्या</u> :-

(क) जाहिरात म्हणजे कोणतीही खाजगी/सार्वजनिक/राज्य सरकार/केंद्र सरकार/सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम/ शासकीय कंपन्या/शासकीय प्राधिकरणे इत्यादींची जमीन/इमारत/इमारतीच्या सभोवतालच्या जागा/गच्ची/ प्राकारावर/ बांधकामे यावर कोणतीही साधने किंवा कोणत्याही रितीने मांडलेले जसे उद्घोषणा किंवा निर्देश, हे जसे की, शब्द, अक्षर, नमूना (Model), भित्ती पत्रके, जाहिरात फलक, कापडी फलक, तात्पुरत्या कमानी, प्रकाशित चिन्हे, नाम फलक, दिशादर्शक फलक, आकाश चिन्ह, प्लाकार्ड, डिजिटल बोर्ड, एलईडी, एलसीडी, बॅकलिट बोर्ड, निऑन बोर्ड डिसप्ले, ईलेक्ट्रॉनिक डिसप्ले, व्हिडीयो डिसप्ले, लेझर शो/देखावा, फूगे इत्यादी ह्यामधील कोणत्याही प्रकारच्या साधनानी, किंवा माध्यमाद्वारे ग्राहकांना आकर्षित करुन किंवा माहिती देऊन व्यावसायिक फायद्याकरीता किंवा प्रसिध्दीकरीता, कोणत्याही रस्त्यावरुन, मार्गावरुन दिसेल अश्या रितीने मांडलेले निवेदन किंवा प्रदर्शित केलेली कोणतीही कृती यांचा त्यात समावेश होतो परंतु, ग्राफीटी स्वरुपाची प्रदर्शित आणि नगरपरिषद व नगरपंचायत किंवा कोणतीही सरकारी प्राधिकरणे यांच्याव्दारे (व्यवसायिक लाभाखेरीज) नागरीकांच्या लाभाकरीता प्रदर्शित करण्यात येणारे नागरी संदेश, याव्दारे केलेली कोणतीही निवेदने किंवा प्रदर्शित केलेली कोणतीही कृती, शब्द, हे जाहिरात म्हणून समजण्यात येणार नाही.

(ख) **फुग्यावरील जाहिरात** म्हणजे गॅस भरून हवेमध्ये तरंगणाऱ्या फुग्यावरील जाहिरात.

(ग) **फिरत्या वाहनावरील जाहिरात** म्हणजे फिरत्या वाहनावर, साईड पॅनेल, वाहनाच्या पाठीमागे स्टीकर /फलक या माध्यमांद्वारे चिटकवलेली जाहिरात तसेच, एकेरी, दुहेरी किंवा अधिक संख्येने असलेली स्टीकर्स, जाहिरात फलक. सदर जाहिराती जेव्हा वाहन रस्त्यावर धावत असेल तेव्हा दृष्यमान होतील.

(घ) **स्थिर वाहनावरील जाहिरात** म्हणजे एकाच ठिकाणी स्थिर असलेल्या वाहनावर, साईड पॅनेल, वाहनाच्या पाठीमागे स्टीकर / फलक या माध्यमाव्दारे चिटकवलेले तसेच एकेरी, दुहेरी किंवा अधिक संख्येने असलेले जाहिरात फलक. सदर जाहिराती जेव्हा वाहन मोक्याच्या ठिकाणी स्थिर(पार्क) केलेले असेल अशा वेळी रस्त्यावरून दुष्यमान होतील.

(ङ) **अभिकरण (एजन्सी)** म्हणजे वैयक्तिक अर्जदार, नोंदणीकृत धर्मादाय संस्था, पेढी (फर्म), शासकीय/निमशासकीय संघटना भागिदारी किंवा कंपनी अधिनियम १९५६ अन्वये विधी संस्थापित झालेली कंपनी.

(च) **कापडी(बॅनर) फलक-** म्हणजे कापड किंवा साहित्य ज्यामध्ये सार्वजनिक ठिकाणी प्रदर्शित करण्यासाठी काही जाहिराती किंवा उद्घोषणा किंवा लेखी विषय समाविष्ट असतील.

(छ) **इमारत** म्हणजे घर, आऊट हाऊस, तबेला, छपरी, झोपडी, टाकी (इमारतीमध्ये किंवा इमारतीच्या कोणत्याही भागामध्ये पिण्याचे पाणी साठविण्यासाठी असलेली टाकी वगळून) व अशी इतर प्रत्येक संरचना यांचा समावेश होतो मग ती चिरेबंदी असो किंवा विटा/लाकूड/माती धातू किंवा कोणतेही इतर सामान याने बांधलेले असेल.

(ज) **बस आश्रय स्थानकांवरील जाहिरात** म्हणजे बस आश्रय स्थानाच्या संरचनेवर प्रदर्शित केलेली जाहिरात, ज्यामध्ये कॅन्टीलिव्हर, लॉलीपॉप इत्यादींचा समावेश होत नाही.

(झ) **इमारती आवरणावरील जाहिरात** म्हणजे बांधकाम चालू असणारी किंवा दुरुस्ती चालू असणारी इमारत जिच्या परांचीवर प्रदर्शित केलेली जाहिरात.

(ञ) **कॅन्टीलिव्हर** म्हणजे रस्त्याच्या दुभाजकावर किंवा पादचारी मार्गावर/फरसबंदी रस्त्यावर दिशा/ठिकाणी किंवा जाहिरात प्रदर्शित करण्यासाठी वापरण्यात येणारा एका बाजूकडे आधार दिलेला/बसवलेला आणि आधार न दिलेल्या लांब भागाच्या अन्य बाजूकडे वाहून नेणारा/क्षितिजलंब असणारा लांब गज.

(ट) **मुख्याधिकारी** याचा महाराष्ट्र नगरपरिषदा, नगरपंचायती व औद्योगिक नागरी अधिनियम मध्ये नमूद केल्याप्रमाणे.

(ठ) **सक्षम प्राधिकारी** म्हणजे मुख्याधिकारी किंवा मुख्याधिकारी यांनी रितसर प्राधिकृत केलेला नगरपरिषद / नगरपंचायतीचा कोणताही अधिकारी.

(ड) **कोरी भिंत (डेड वॉल)** म्हणजे जिच्या मध्ये खिडक्या किंवा कोणत्याही इतर खुल्या जागा याद्वारे भंग न झालेली भिंत.

(ढ) **नगरपरिषद / नगरपंचायत** म्हणजे महाराष्ट्र नगरपरिषद, नगरपंचायत व औद्योगिक वसाहत अधिनियम, १९६५ मध्ये नमूद केल्याप्रमाणे.

(ण) **सिमाभिंत** म्हणजे इमारतीच्या भूखंडाच्या सीमारेषेच्या काठावर उभारलेली भिंत/रचना/खुली जागा/इतर मालमत्ता.

(त) **दिशा दर्शक फलक** म्हणजे जमिन किंवा इमारतीच्या छपराचा कोणताही भाग यावर कोणत्याही बांधकामाचा तट भिंत, यावर उभारलेल्या बांधकामाचा कोणताही दर्शनी भाग, जो रस्ता, इमारत, पार्क किंवा खाजगी आणि व्यावसायिक आस्थापनानी बनवलेले कोणतेही स्थान (ठिकाण) जे त्यांची कार्यालय किंवा व्यवसायिक निर्गम मार्ग यांची दिशा दाखविण्यासाठी असलेले फलक. शासकीय किंवा निमशासकीय प्राधिकरणे यांनी बसविलेल्या दिशा दर्शक फलकांसाठी कोणत्याही प्रकारच्या परवानगीची आवश्यकता भासणार नाही.

(थ) **इलेक्ट्रॉनिक प्रदर्शन** म्हणजे बांधकामावर बसवलेले इलेक्ट्रॉनिक पध्दतीने संचलित करण्यात येणारे जाहिरात प्रदर्शन, एलईडी/एलसीडी/निऑन साईन इत्यादी.

(द) **गंत्री जाहिरात** म्हणजे, रस्त्याच्या दोन्ही बाजूस उभारलेल्या गंत्रीवर आणि बहुतकरून रस्त्याच्या कोणत्याही बाजूस असलेल्या धातुच्या पूर्वरचित बध्द स्तंभांच्या भागावर, ज्यावर दिशादर्शक फलक वाहतुकीच्या बाजूकडे तोंड करून व जाहिरातीचा दर्शनी भाग वाहतूकीच्या विरूध्द बाजूकडे तोंड करून, रस्त्याच्या बाजूला असलेल्या त्या स्तंभांच्या सर्वात वरच्या भागास प्रकाश योजना सोडून बसविलेली तथापि, पादचाऱ्यांना अडथळा होणार नाही अशी कायमस्वरूपी कमानी वरील जाहिरात असा आहे.

(ध) **काचेच्या दर्शनी भागावरील** जाहिरात म्हणजे कोणत्याही इमारतीच्या/बांधकामाच्या काचेच्या दर्शनी भागावरील लावलेली किंवा चिटकवलेली जाहिरात.

(न) **ग्लो साईन बॉक्स जाहिरात** म्हणजे धातूच्या पत्र्याच्या पुढील बाजूस कोणतेही पारदर्शक, अर्धपारदर्शक पडदा बसवून, तिच्या मागील बाजूकडून विद्युत दिव्यांचा उपयोग करून प्रदर्शित केलेली जाहिरात.

(प) **ग्राफीटी** म्हणजे भिंतीवरील रंगचित्र.

(फ) **भूभाडे** म्हणजे भोगवटादाराद्वारे कोणत्याही कारणाकरिता वापरण्यात येणाऱ्या जमिनीच्या मालकास इमारतीच्या/जमीनीच्या मालकास इमारतीच्या/ जमीनीच्या भोगवटाद्वारे भाडेपट्टा/भाडेदारी या मार्गाने अदा करण्यात येणारे भाडे.

(ब) **जाहिरात फलक** म्हणजे जाहिरातीच्या उद्दिष्टाकरिता आणि जनतेला कोणत्याही ठिकाणी आकर्षित करण्याच्या दृष्टीकोनातून माहिती देण्यासाठी, व्यक्ती, सार्वजनिक कामगिरी, विक्रीचा माल इत्यादीची माहिती देण्यासाठी चित्र, शब्द किंवा माहितीसह जमिन, इमारत, इमारतीच्या सभोवतालची जागा, गच्ची, प्राकारावर तसेच जमिनीवरील बांधकामाचा कोणताही पृष्ठभाग किंवा कोरी भिंत ह्यावर उभारलेला जाहिरात फलक, त्यामध्ये पारदर्शक स्वरुपाच्या एक किंवा अधिक रंगाचा वापर केलेल्या निऑन बल्ब/दिवे/लाईट इत्यादींचा वापर केलेल्या जाहिराती आणि एलईडी दिव्यांचे कटाआऊट यांचाही समावेश होतो.

(भ) **किऑस्क** म्हणजे माहिती प्रदान करण्यासाठी किंवा जाहिरात प्रदर्शित करण्यासाठी वापरल्या जाणाऱ्या सार्वजनिक क्षेत्रातील एक लहान रचना, ज्यामध्ये सहसा परस्पर संवादी डिस्प्ले स्क्रीन किंवा स्क्रीन समाविष्ट असतात.

(म) **जमिन** म्हणजे जिच्यावर बांधकाम करण्यात येत आहे किंवा करण्यात आले आहे किंवा जी पाण्याने आच्छादलेली आहे अशी जमीन (जमिनीपासून मिळणारे फायदे किंवा भू-संलग्न वस्तू किंवा भू-संलग्न असलेल्या कोणत्याही वस्तूशी कायमच्या जखडलेल्या वस्तू आणि विधानमंडळ अधिनियम अन्वये कोणत्याही सडकेवर निर्माण करण्यात आलेला हक्क यांचा समावेश होतो.).

(य) **लेझर जाहिरात** म्हणजे प्रोजेक्टर वापरून जागा/पडदा यांच्या पृष्ठ भागावर प्रदर्शित करण्यात येणारी जाहिरात.

(र) **अनुज्ञाप्ती** म्हणजे या नियमातील तरतूदींचे अनुपालन करण्याच्या अधिन आकाशचिन्ह, जाहिरात उभारण्यास सक्षम प्राधिकाऱ्याने दिलेले प्राधिकारपत्र असा आहे.

(ल) **अनुज्ञापन शुल्क** म्हणजे काही सेवांचे अनुपालन करण्याच्या विशेषाधिकारांसाठी किंवा व्यवसायिकांचा काही प्रणालीमध्ये व्यस्त होण्यासाठी सरकारी अभिकरणाला (एजन्सी) व्यक्ती किंवा व्यवसायिकाद्वारे अदा करण्यात येणारी रक्कम.

(व) **लॉलीपॉप** म्हणजे जमिनीवर उभारलेल्या खांबाच्या वरील टोकावर लावलेल्या जाहिरात फलकाचा गोलाकार/चौकोनी तुकडा.

(श) **मालक** म्हणजे याचा कोणत्याही परिवास्तूच्या संदर्भातील अर्थ, जी व्यक्ती उक्त परिवास्तूचे भाडे घेते ती किंवा जी परिवास्तू भाडयाने दिली असती तर, जिला तिचे भाडे घेण्याचा हक्क असता ती व्यक्ती असा आहे व त्यामध्ये पुढील व्यक्तींचा समावेश होतो :-

(एक) जो मालकाच्या वतीने असे भाडे घेतो तो अभिकर्ता किंवा विश्वस्त;

(दोन) जो धार्मिक किंवा धर्मादाय प्रयोजनांसाठी असलेल्या कोणत्याही परिवास्तूचे भाडे घेतो किंवा अशी परिवास्तू ज्याच्याकडे सोपवली आहे किंवा तिच्याशी ज्याचा संबंध आहे असा अभिकर्ता किंवा विश्वस्त.

(तीन) उक्त परिवास्तूचा ताबा घेण्यास किंवा तिचा मालक म्हणून असलेल्या हक्कांचा वापर करण्यास, सक्षम अधिकारिता असलेल्या कोणत्याही मा.न्यायालयाने नेमलेला धारक, समपहर्ता किंवा व्यवस्थापक;

(चार) सहकारी संस्थांच्या प्रकरणी सदर संस्थेची सर्वसाधारण सभा.

(ष) **परवाना** म्हणजे कोणतेही आकाश चिन्ह, जाहिरात उभारणे, बसवणे किंवा त्याचे जतन करणे याकरीता नगरपरिषद /नगरपंचायत मुख्याधिकारी (किंवा मुख्याधिकारी नगरपरिषद/नगरपंचायत यांनी प्राधिकृत केलेला अधिकारी) लेखी परवानगी.

(स) **परीवास्तु** म्हणजे या संज्ञेत इमारती व कोणत्याही धारणाधिकाराखालील जमिनी यांच्या समावेश होतो, मग त्या खुल्या असोत किंवा परिवेष्टित असोत, त्यांच्यावर बांधकाम करण्यात आलेले असो किंवा नसो आणि त्या सार्वजनिक असोत किंवा खाजगी असोत;

**(ह) विहित अर्जाचा नमुना** म्हणजे आयुक्तांनी विहित केलेला प्रपत्र 'अ' असा संबोधित केलेला नमुना, जो जाहिरात उभारण्याकरिता किंवा प्रदर्शित करण्याकरिता नगरपरिषद/नगरपंचायतीस सादर करावयाच्या परवानगी साठीचा अर्ज असेल.

क्ष) **खाजगी सडक** म्हणजे जी सार्वजनिक सडक नाही अशी सडक.

त्र) **सार्वजनिक सडक** म्हणजे, जी आतापर्यंत नगरपरिषद/नगरपंचायतीने समतल केलेली आहे किंवा जिच्यावर फरसबंदी केलेली आहे, खडी टाकली आहे, पाणी वाहून जाण्यासाठी पाट काढलेले आहेत, गटारे केलेली आहेत किंवा जिची दुरुस्ती केलेली आहे अशी कोणतीही सडक आणि महाराष्ट्र नगरपरिषद / नगरपंचायत अधिनियमाच्या तरतुदींन्वये व जी सार्वजनिक सडक होते किंवा जी सार्वजनिक सडक म्हणून नगरपरिषद/नगरपंचायतीमध्ये निहित होते, अशी कोणतीही सडक.

(क क) **छप्पर** म्हणजे मंगलोरी कौले, ॲस्बेसटॉसचे पत्रे/ धातूचे पत्रे किंवा कोणत्याही इतर साहित्याचे पत्रे यांचे छप्पर असणारे बांधकाम तसेच बांधकामावरचे उतरते छप्पर.

(क ख) **स्क्रॉलर (लेखपट्टक दर्शी) जाहिरात** म्हणजे, जाहिरात प्रदर्शित करणाऱ्या जाहिरात पटलावर मुद्रित पट अखंडितपणे आवर्तन पध्दतीने फिरण्यासाठी कळ बसविलेला पेटीच्या आकारातील दर्शक पटल, असा आहे. (मग ती प्रकाश योजना असलेली किंवा नसलेली असेल).

(क ग) **समुद्रामुखी बाजू** म्हणजे जमिनीपासून दूर आणि खुल्या समुद्राच्या रोखाने असणारी दिशा किंवा बाजू.

(क घ) **शो-केस जाहिरात** म्हणजे तीन बाजूने बंद केलेली आणि कोणत्याही रस्त्यावरुन दिसू शकेल आणि जाहिराती प्रदर्शित करण्यासाठी वापरण्यात येणारी पेटी.

(क ड) **पुरस्कर्ता** म्हणजे पैसे देऊन किंवा कोणत्याही व्यापारी लाभाशिवाय जाहिरात पुरस्कृत करते अशी व्यक्ती.

(क च) **थांबारेषा** म्हणजे जेथे सिग्नल परस्परांना छेदतात तेथील नाका पार करण्यापूर्वी जेथे वाहतुकीस थांबावे लागते ती रेषा . सर्वसाधारणपणे ही रेषा झेब्रा क्रॉसिंगला समांतर रंगवलेली भरीव रेषा असते.

(क छ) **आकाश-चिन्ह** म्हणजे, कोणतीही जमीन, इमारत, इमारतीच्या सभोवतालच्या जागा, गच्ची, प्राकारावर किंवा संरचना यावरील संपूर्णपणे किंवा अंशतः कोणताही खांब, स्तंभ, प्रमाणभूत चौकट किंवा इतर बाबींचा आधार दिलेला किंवा यांस जोडलेला जाहिरातीच्या, घोषणेच्या किंवा निदेशनाच्या स्वरुपातील कोणताही शब्द, अक्षर, प्रतिमान, चिन्ह, साधन किंवा प्रतिकृती असा असून, असे जे आकाशचिन्ह किंवा ज्याचा कोणताही भाग रस्त्यातील कोणत्याही ठिकाणापासून आकाशात दिसू शकतो ते आकाशचिन्ह, असा आहे व त्यामध्ये असा संपूर्ण खांब, स्तंभ, प्रमाणभूत चौकट किंवा इतर आधार याचा किंवा त्याचा प्रत्येक भागाचा समावेश होतो. 'आकाशचिन्ह' या शब्दप्रयोगात कोणत्याही सडकेवर कोणतीही जाहिरात, घोषणा, किंवा निर्देशन याच्या प्रयोजनासाठी संपूर्णपणे किंवा अंशतः उपयोगात आणलेला कोणताही वायूगोल, हवाई छत्री किंवा तत्सम इतर साधने यांचाही समावेश होतो. परंतु, त्यात पुढील गोष्टींचा समावेश होणार नाही:-

(एक) कोणताही ध्वजदंड, स्तंभ, वायुध्वज किंवा वातकुक्कुट, हा कोणताही जाहिराती, घोषणा किंवा निदेशन यांच्या प्रयोजनासाठी संपूर्णपणे किंवा अंशतः योजण्यात किंवा वापरण्यात आला नसेल तर, असा ध्वजदंड, स्तंभ, वायुध्वज किंवा वातकुक्कुट;

(दोन) एखाद्या रेल्वे कंपनीच्या व्यवसायाशी/कामकाजाशी केवळ संबंधित असलेला व कोणताही रेल्वे, रेल्वे स्थानक, रेल्वे आवार, फलाट किंवा रेल्वे कंपनीच्या मालकीच्या स्थानकाकडे जाणारा पोचमार्ग यांवर किंवा कोणत्याही रस्त्यावर किंवा सार्वजनिक जागेवर पडणार नाही, अशा रीतीने सर्वस्वी रोवलेला, पुर्वोक्तप्रमाणे असलेला कोणताही शब्द, अक्षर, प्रतिमान, चिन्ह, साधन किंवा प्रतिकृती;

(तीन) विकावयाच्या किंवा भाडयाने द्यावयाच्या जमिनीसंबंधी किंवा इमारतीसंबंधी, अशा जमिनीवर किंवा इमारतीवर लावलेली कोणतीही नोटीस;

(क ज) **तात्पुरत्या कमानी** म्हणजे शुभेच्छा देण्यासाठी किंवा जाहिरात प्रदर्शित करण्यासाठी रस्त्यामध्ये उभारलेल्या तात्पुरत्या संरचना.

(क झ) **गच्ची** म्हणजे घर, इमारत यांचे सपाट छप्पर, छप्पर असलेल्या बांधीव जागेचा आकाशाच्या दिशेने उघडा असणारा भाग.

(क ञ) **वाहतुक बेट** म्हणजे रस्त्यात लोकांना सुरक्षित उभे राहता यावे म्हणून तयार केलेला काहीसा ऊंच असा (भरीव व रंगवलेला) भाग म्हणजे रस्ता आणि रहदारी मार्गावरील जागा तसेच, तीव्र कोनानी परस्पर छेदलेल्या रस्त्यामधील जागा किंवा अरुंद पट्टी.

(क ट) **वाहतुक बेट टेहळणी मनोरा** म्हणजे लोकांच्या सुरक्षततेसाठी आणि सुरळीत वाहतूक होण्याकरीता निर्माण केलेला/वापरावयाचा मनोरा/संरचना.

(क ठ) **त्रिमिती जाहिरात** म्हणजे एकामागोमाग एक अशा पध्दतीने फिरणारे त्रिकोणी पॅनेल यामध्ये त्रिकोणी भागाचे तीन दर्शनी भाग एकामागोमाग एक असे दिसतात व त्या व्दारे तीन वेगवेगळे जाहिरातींचे संदेश प्रदर्शित होतात. सदर जाहिरात फलक प्रकाशित किंवा अप्रकाशित असू शकतील.

(क ड) **वाहन** म्हणजे स्वयंचलित मोटर कार आणि प्रत्येक चाकी असणारे वाहन, जे सार्वजनिक रस्त्यावर चालवण्यासाठी वापरण्यात येते आणि चालवण्यास सक्षम असते यांचा समावेश होईल.

(क ढ) **भित्ती चित्र (वॉल पेन्टींग) जाहिरात** म्हणजे एखादया इमारतीच्या भिंतीवर किंवा संरचनेवर किंवा कोणत्याही नागरी संरचनेवर जाहिरात प्रत्यक्षपणे रंगवून त्याव्दारे प्रदर्शित केलेली जाहिरात असा आहे.

(क ण) **सायकलींवरील जाहिरात** म्हणजे सायकलींवर प्रदर्शित केलेली जाहिरात.

(क त) **चौक, चौकाचा मध्य/छेदनबिंदू** म्हणजे दोन रस्त्यांच्या मध्य रेषा जिथे एकमेकांना छेदतात असा बिंदू होय दोन किंवा दोन पेक्षा अधिक रस्ते एकत्रित येत असतील अशा वेळी थांबा रेषा जेथे असतील (वाहतूक सुव्यवस्थित होण्याच्या दृष्टीने) असे मुख्य रस्ते विचारात घेण्यात येतील.

२) या नियमात वापरलेले परंतू व्याख्या न केलेले शब्द व शब्दप्रयोग यांना, अधिनियमाप्रमाणे अनुक्रमे जे अर्थ नेमून दिलेले असतील तेच अर्थ असतील.

**३. नवीन जाहिरात फलक उभारणीसाठी परवानगी :-** (१) कोणतेही अभिकरण, सक्षम प्राधिकरणाची लेखी स्वरूपातील परवानगी असल्याशिवाय, जाहिरात फलक (होर्डिंग) भित्तीपत्रके, आकाश-चिन्ह (स्काय-साईन), किऑस्क, भित्तीचित्रे (वॉल पेंटींग), फुगे उभारणार नाही, दाखविणार नाही, लावणार नाही, प्रस्थापित करणार नाही किंवा प्रदर्शित करणार नाही. या नियमानमध्ये आणि त्या अधिनियमांच्या तरतुदींमध्ये नमूद केलेल्या सर्व निकषांची पूर्तता करीत असल्याबाबत त्याची खात्री पटल्याखेरीज अशी परवानगी दिली जाणार नाही.

(२) (क) महाराष्ट्र नगरपरिषद / नगरपंचायत व औद्योगिक वसाहत अधिनियमाच्या कलम १९६ च्या आणि या नियमांच्या तरतुदींना अधीन राहून, नगरपरिषद / नगरपंचायत निविदा मागवून, नगरपरिषद / नगरपंचायत जमिनीवर पोटनियम (१) मध्ये नमूद केलेल्या विभिन्न स्वरूपातील जाहिरात प्रदर्शित करण्यासाठी परवाना देईल. अशा प्रकरणी आधिच्या सर्व जाहिरात परावानग्यांचा त्यांच्या मंजुरी/मंजूरी कालावधीनुसार विचार करणे आवश्यक राहील. मंजूरी स्तरावर असलेल्या तसेच यापूर्वीच्या कार्यरत परवान्यांचा बाबतीत पूर्वीच्या नियमांप्रमाणे कार्यवाही करावी. तथापि, नविन प्राप्त प्रस्तावांवर या नियमांनुसार कार्यवाही करावी. सदर नियम पूर्वलक्षीप्रभावाने लागु होणार नाहीत.

(ख) विद्यमान करार किंवा ज्या दिनांकास हे नियम अंमलात येतील त्या दिनांकापासून ५ वर्षाच्या कालावधीत अस्तित्वातील परवान्याबाबत मुख्याधिकारी यांनी नगरपरिषद/नगरपंचायतीशी विचार विनियम करुन निर्णय घ्यावा.

(३) (क) आपल्या जमिनीवर किंवा जागेवर जाहिरात प्रदर्शित करण्याची किंवा जाहिरात फलक लावण्याची इच्छा असलेल्या इतर कोणत्याही अभिकरणास, या नियमांमध्ये अंतर्भूत केलेल्या तरतुदींनुसार आणि त्या अधिनियमाच्या संबंधित कलमांन्वये सक्षम प्राधिकाऱ्याकडून वैध लायसन प्राप्त करता येईल.

(ख) सक्षम प्राधिकारी असा परवाना देताना, या नियमावलीमधील तरतुदी विचारात घेईल.

(४) जर जाहिरातीमध्ये, या मार्गदर्शक तत्वाच्या तरतुदींचे अनुपालन होत असेल आणि इमारतीच्या सभोवताली असणाऱ्या मोकळ्या जागेवर उभारलेले असावा व त्याच्यामुळे तेथील रहिवाश्यांना अडथळा येत नसेल किंवा रहिवाशांना वाहनांची ये-जा करण्यास व पार्किंगसाठी अडथळा होत नसेल तर, त्या जाहिरातींसाठी सर्वसाधारपणे परवानगी नाकारली जाणार नाही.

(५) जर ३ महिन्यांच्या आत जाहिरात फलक उभारला नाही तर, दिलेली परवानगी रद्द /रद्दबातल होईल. अर्जदार असलेल्या कोणत्याही अभिकरणास, या बाबतीत निर्धारित कार्यपध्दतीचा अवलंब करून नव्याने अर्ज करता येईल.

(६) जाहिरात प्रदर्शित करण्याच्या प्रयोजनासाठी संरचना उभारण्यात आल्याचे आढळून येईल किंवा वैध परवाना न घेता जाहिरात फलक उभारलेला असेल किंवा जाहिरात प्रदर्शित केलेली असेल तर, असा जाहिरात फलक/जाहिरात,अभिकरणाला कोणतीही सूचना दिल्याशिवाय, काढून टाकण्याची कार्यवाही केली जाण्यास पात्र असेल आणि ते अभिकरण देखील नगरपरिषद/नगरपंचायतीकडून वेळोवेळी विहीत करण्यात येईल असा दंड भरण्यास पात्र ठरेल.

(७) सक्षम प्राधिकाऱ्यास, स्वविवेकानुसार आणि लेखी आदेशाव्दारे, जो कोणताही जाहिरात फलक परवानगी न घेता बसविण्यात आला असेल असा कोणताही जाहिरात फलक, आकारणी योग्य फी च्या पाच पट इतकी प्रशमन फी आकारून नियमित करता येईल. मात्र, असा जाहिरात फलक किंवा जाहिरात ही, या मार्गदर्शक तत्वाच्या तरतुदींनुसार असावी.

(८) जाहिरात फलक रस्ते रूंदीकरणामध्ये काढावा लागल्यास तो फलक योग्य त्या ठिकाणी बाधीत जाहिरातदाराच्या मागणीनुसार सक्षम प्राधिकाऱ्याच्या परवानगीने उभारता येईल. सक्षम प्राधिकाऱ्यामार्फत निर्देशित करण्यात येईल, त्यानुसार अभिकरण (एजन्सी)/जाहिरातदार फलकाची पुनर्रचना, फेरजुळवणी किंवा त्यांचे स्थानांतरण करेल. जाहिरातदार /अभिकरण (एजन्सी) त्यासाठी कोणत्याही नुकसान भरपाईचा दावा करणार नाही. जाहिरात फलकाची स्थानांतरणाची परवानगी संबंधीत सक्षम प्राधिकरणाने देण्याची कार्यवाही करावी. आवश्यक कागदपत्रांची पूर्तता केल्यानंतर आणि कोणत्याही न्यायालयामध्ये कोणताही खटला प्रलंबित नसेल तर स्थानांतरण मंजूर करता येईल. जाहिरात फलक स्थानांतरीत करण्यासाठी येणाऱ्या खर्चाची जबाबदारी जाहिरातदाराची राहील.

(९) नविन नियम पूर्वलक्षी प्रभावाने लागू होणार नाहीत.

**४. परवानगीची आवश्यकता नसलेल्या जाहिराती :-** रोषणाई केलेल्या जाहिराती आणि आकाश-चिन्ह (स्काय-साईन) वगळता पुढील प्रकाराच्या जाहिरातींसाठी सक्षम प्राधिकाऱ्याकडून परवानगी घेण्याची आवश्यकता नसेल:-

(क) रस्त्यावरून न दिसणारी परिवास्तुच्या आवारांअंतर्गत प्रदर्शित केलेली जाहिरात.

(ख) रेल्वे, राज्य परिवहन यांच्या कामकाजाविषयी आणि रेल्वे, राज्य परिवहनाच्या परिवास्तूंमध्ये प्रदर्शित केलेली परंतु, कोणत्याही रस्त्याच्या समोर नसलेली जाहिरात.

(ग) व्यावसायिक परिवास्तूमध्ये चालवण्यात येणाऱ्या व्यापारासंबंधी किंवा व्यवसायासंबंधी,त्या परिवास्तूत किंवा तिच्यावर प्रदर्शित केलेल्या, परंतु कोणत्याही रस्त्याच्या समोर नसलेल्या जाहिराती.

(घ) कोणत्याही परिवास्तूच्या किंवा तीमधील कोणत्याही मालमत्तेच्या विक्रीसंबंधी किंवा ती भाड्याने देण्यासंबंधी त्या परिवास्तूत किंवा तिच्यावर प्रदर्शित केलेल्या जाहिराती.

**५. जाहिरात फलक/जाहिरात प्रदर्शित करण्यावरील निर्बंध :-**

(क) वाहन चालकांच्या डोळ्यावर तिरीप येईल इतक्या प्रखरतेची रोषणाई केलेला जाहिरात फलक प्रदर्शित करण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ख) दोन किंवा दोनपेक्षा जास्त रस्ते जेथे एकत्र मिळतात अशा ठिकाणी, पोचमार्गाच्या थांबारेषेपासून पुढील / समोरील बाजूस २५ मीटर इतक्या अंतराच्या आत, जमिनीवर उभारलेल्या जाहिरात फलकांची दर्शनी बाजू / जाहिरात प्रदर्शित केलेली बाजू समोर येईल,अशा प्रकारे कोणताही जाहिरात फलक प्रदर्शित करण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ग) सार्वजनिक खुली जागा म्हणजे मनोरंजनाची मैदाने, क्रिडांगणे, उद्याने, बगिचे यामध्ये कोणताही जाहिरात फलक लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(घ) कोणत्याही रस्त्यावर कोणतेही फिरते जाहिरात प्रदर्शनी वाहन उभे करण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ड) पुरातत्वीय, वास्तुशास्त्रीय, सौंदर्यशास्त्रीय आणि ऐतिहासिक व वारसागामी महत्व असलेल्या इमारतींवर कोणताही जाहिरात फलक लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(च) नदी पात्रात, तलावात, कॅनॉल आणि जलाशयांत कोणताही जाहिरात फलक लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(छ) तिवरांच्या वनांत, खाडीत किंवा समुद्रात कोणताही जाहिरात फलक (होर्डिंग) लावण्याची परवानगी दिली जाणार नाही. (याबाबत सी.आर.झेड च्या नियमानुसार कार्यवाही करावी)

(ज) इमारतीच्या प्राकारावर/गच्छीवर जाहिरात फलक लावण्यास परवानगी दिली जाणार नाही.

(झ) रोषणाई केलेल्या/निऑन जाहिरात फलकांच्या (होर्डिंग) बाबतीत, पुढील निर्बंधाचे पालन करण्यात यावे:-

(एक) प्रकाशमानाची मर्यादा ही १ सीडी/सी एम एवढ्या प्रभव मर्यादेपेक्षा अधिक नसावी. रात्री ११ नंतर रोषणाई चालू ठेवण्यात येऊ नये.

(दोन) निवासी परिवास्तूमधील निऑन (फलक) हे, लुकलुकणारे नसावेत.

(तीन) निऑन फलक रात्री ११ वाजता बंद करावेत.

(चार) दृकश्राव्य किंवा चलचित्र डिजीटल जाहिरातींना परवानगी दिली जाणार नाही. एलइडी दर्शक पट (डिस्प्ले) हे केवळ स्थिर चित्री असावेत. किमान दर १० सेकंदानंतर प्रतिमांमध्ये होणारा बदल अनुज्ञेय असेल.

(पाच) एलइडी दर्शक पट (डिस्प्ले) फलकांना विद्युत विभागाच्या (महाराष्ट्र राज्य विद्युत विभाग) व संबंधीत पोलीस वाहतूक विभागाच्या परवानगीशिवाय संबंधीत प्रकाशीय फलक लावण्यास परवानगी देण्यात येऊ नये.

(ञ) वाहतूक बेटाच्या सभोवती आणि संकेत संगमाच्या (सिग्नल जंक्शन) ठिकाणी पोचमार्गाच्या थांबारेषेपासून पुढील / समोरील बाजूस २५ मीटर इतक्या अंतराच्या आत, जमिनीवर उभारलेल्या जाहिरात फलकांची दर्शनी बाजू / जाहिरात प्रदर्शित केलेली बाजू समोर येईल. अशा प्रकारे कोणताही जाहिरात फलक लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ट) ज्या जाहिरातींमुळे कोणत्याही परिवास्तूच्या उजेडास किंवा वायुवीजनास अडथळा होईल अशी तेथील रहिवाश्यांची तक्रार आल्यास जाहिरात फलक (होर्डिंग) लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ठ) अधिनियमाच्या आणि नियमांच्या इतर तरतुदींना अधीन राहून, कोणत्याही इमारतीच्या निर्गम भिंतीशिवाय अन्य भिंतीवर, वेष्टन निऑन /डिजीटल जाहिरातीं व्यतिरिक्त कोणतेही जाहिरात फलक लावण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ड) जाहिरात फलकांना रोषणाई करण्यासाठी डिझेल जनित्र संच (जनरेटर) वापरण्याची परवानगी दिली जाणार नाही, कारण त्यामुळे ध्वनिप्रदुषण आणि वायु प्रदुषण निर्माण होते.

(ढ) रस्त्याच्या पृष्ठभागावर ३० फुट पेक्षा अधिक उंचीचे जाहिरात फलक उभारले जाणार नाहीत.

(ण) पदपथावर आणि सार्वजनिक रस्त्यावर कोणताही जाहिरात फलक किंवा जाहिरात प्रदर्शित करण्यात येणार नाही.

(त) जेथे पदपथ नसेल तेथे सार्वजनिक रस्त्यावर कोणताही जाहिरात फलक प्रक्षेपित केला जाणार नाही.

(थ) एकावर दुसरा याप्रमाणे दोन्ही जाहिरात फलक या नियमवालीतील तरतुदींनुसार असल्याखेरीज परवानगी दिली जाणार नाही.

(द) भित्ती चित्रणाव्दारे कोणतीही जाहिरात प्रदर्शित करण्याची परवानगी दिली जाणार नाही.

(ध) एकत्रित स्वरूपातील जाहिरात फलक या नियमावलीतील तरतुदींनुसार असल्याखेरीज अनुमती दिली जाणार नाही.

(प) जाहिरात फलक पुढील परिस्थितीत लावण्याची परवानगी दिली जाणार नाही :-

(एक) जाणाऱ्या, येणाऱ्या किंवा दोनमार्गी वाहनांना वाहतूक करण्यामध्ये अडवणूक होईल अथवा मार्ग दिसण्यामध्ये अडथळा निर्माण होईल अशा पध्दतीने व अशा ठिकाणी कोणताही जाहिरात फलक लावणे;

(दोन) समुद्र, सुर्योदय किंवा सुर्यास्त पाहण्यासाठी असलेल्या ठिकाणाहून ते पाहण्यासाठी अडथळा निर्माण होईल असा कोणताही जाहिरात फलक लावणे;

(तीन) ज्या इमारतीचे स्थैर्य प्रमाणपत्र (stability certificate) नाही अशा इमारतींवर जाहिरात फलक लावणे;

(चार) ज्या इमारतीबाबत अधिनियमयान्वये किंवा महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम, १९६६ अन्वये नगरपरिषद / नगरपंचायत स्तरावर अथवा मा. न्यायालयात कारवाई प्रलंबित असेल किंवा ज्या इमारतीच्या मालकाला कायदेशीररित्या काम थांबवा नोटीस बजावण्यात आली असेल, अशा इमारतीवर जाहिरात फलक लावणे;

(पाच) जी इमारत (अंशतः किंवा पूर्णतः) धोकादायक म्हणून घोषित करण्यात आली असेल अथवा कायद्यान्वये जिला अशा प्रकारची नोटीस बजावण्यात आली असेल, अशी इमारत;

(सहा) ज्यावरील जाहिरातीव्दारे सार्वजनिक नितिमत्ता आणि सभ्यता यांचे उल्लंघन होण्याचा संभव आहे असा जाहिरात फलक लावण्यास परवानगी देण्यात येणार नाही. अशी जाहिरात प्रदर्शित केल्याने सार्वजनिक नितिमत्ता व सभ्यता यांच्या प्रमाणकांचा भंग होईल अशी सक्षम प्राधिकाऱ्याची खात्री झाली तर, जाहिरात फलक काढून टाकण्याबाबतची लेखी सूचना प्राप्त झाल्यानंतर अभिकरण ती जाहिरात तात्काळ काढून टाकील; (दंड संहितेनुसार कायदेशीर कार्यवाही करण्यात येईल.)

(सात) पादचाऱ्यांच्या मार्गामध्ये किंवा त्यांना मार्ग दिसण्यामध्ये अडथळा निर्माण होईल अशा स्वरूपातील जाहिरात;

(आठ) अगोदर लावलेली कोणतीही जाहिरात दिसण्यामध्ये अडथळा निर्माण होईल असा जाहिरात फलक;

(नऊ) जाहिरात फलकावर, परवानाधारकाच्या परवानगी शिवाय फ्लेक्स लावणारे आणि ज्यांचे करिता फ्लेक्स लावले आहे ते, कारवाईस पात्र ठरतील.

**६. जाहिरात फलकाचा आकार, अंतर व उंची याबाबतचे सर्वसाधारण नियम :-**

(१) जाहिरात फलकांचा प्रमाण आकार पुढीलप्रमाणे असेल :-

(एक) १० फुट × २० फुट

(दोन) २० फुट × १० फुट

(तीन) २० फुट × २० फुट

(चार) ३० फुट × १५ फुट

(पाच) ३० फुट × २० फुट

परंतु, खालील ठिकाणच्या जाहिरातींबाबत सक्षम प्राधिकाऱ्यास वेगवेगळया आकाराच्या जाहिरातींना अनुमती देता येईल,-

(एक) कोरी भिंत,

(दोन) भुयारी मार्गाचे प्रवेशव्दार,

(तीन) पुलावरील कठडे आणि असेच इतर विषम आकाराचे कोनाडे त्याचप्रमाणे समुद्रातील गलबते, तराफे, जलयाने आणि वाहने.

(२) विहीत आकाराहून मोठया आकाराच्या जाहिरात फलकांना परवानगी देण्यात येणार नाही.

(३) कोणताही जाहिरात फलक दर्शनीय रस्त्याच्या पातळीच्या ३० फुट पेक्षा अधिक उंचीवर उभारता येणार नाही. जाहिरात फलकाची तलीय सूट ही (जमिनीपासून जाहीरात फलकापर्यंत), दर्शनीय रस्त्याच्या पातळी पासून १० फूटापेक्षा कमी नसेल, इतक्या उंचीवर असेल.

(४) जाहिरात फलक त्या भूखंडाच्या बाह्य सीमा रेषे बाहेर येता कामा नये.

(५) अशा स्थिरता प्रमाणपत्राचा कालावधी किमान ३ वर्षायेवढा राहील.

(६) जाहिरात फलकाचा तळभाग १० फुट पेक्षा कमी उंचीवर असता कामा नये.

(७) पोचमार्गाच्या थांबा रेषेपासून पुढील / समोरील बाजूस २५ मीटर इतक्या अंतराच्या आत, इमारतीं व्यतिरिक्त जमिनीवर उभारलेल्या जाहिरात फलकांची दर्शनी बाजू / जाहिरात प्रदर्शित केलेली बाजू समोर येईल, अशा प्रकारे कोणताही जाहिरात फलक प्रदर्शित करण्याची परवानगी दिली जाणार नाही".

(८) पाठपोट स्वरूपाच्या आणि 'व्ही' आकाराच्या, प्रमाण आकारातील जाहिरात फलकास परवानगी देता येईल.

(९) जाहिरात फलकाच्या आधारासाठी असलेली संरचनात्मक चौकट ही फलकाच्या विहीत आकाराच्या तुलनेत मोठ्या आकाराची असणार नाही. कोणताही वृद्धिशील फेरबदल हा, प्रमाणकांविरुध्द जाहिरात फलकाच्या आकारातील वाढ आणि परवान्याच्या अटी व शर्तीचा भंग असल्याचे मानले जाईल.

(१०) या नियमांच्या अगोदर परवानगी दिलेल्या सध्या असलेल्या जाहिरात फलकांच्या बाबतीत, या नियमावलीनुसार अशा फलकांमध्ये काही बदल करावयाचे असल्यास सहा महिन्यांची सवलीतीची मुदत देण्यात येईल व असे फलक नुतनीकरणास मार्गदर्शक तत्वानुसार पात्र असतील. (नियम ३ मधील २ (क) (ख) प्रमाणे)

(११) बस थांब्याच्या वरच्या टोकावर आणि मागील बाजूस, सक्षम प्राधिकारी ठरवील अशा उचित आकाराचे अप्रकाशीत अथवा पार्श्वप्रकाशमान जाहिरात फलक लावण्यास परवानगी देता येईल. तथापि, जाहिरातदारास नगरपरिषद/नगरपंचायतीच्या निश्चित केलेला जादा आकार/अधिमुल्य भरावे लागेल.

(१२) अप्रकाशीत विशेष जाहिरात संरचना म्हणून तात्पुरत्या स्वरूपातील संरचना कुंपणास, जमिनीपासून १० फुट एवढ्या उंचीच्या निर्बंधाच्या अधीनतेने परवानगी देता येईल. त्या जाहिरातीचे क्षेत्र अ-प्रमाणीकृत असे असेल.

(१३) विद्युत खांब इत्यादींवर प्रदर्शित केल्या जाणाऱ्या (किऑस्क) जाहिराती शहरात सर्वत्र २ फुट रुंद × ३ फुट उंच इतक्या प्रमाण आकाराच्या आणि जमिनीपासून १४ फुट इतक्या तलीय सूट अंतरावर (बॉटम क्लिअरन्स) असतील.

**७. फलकांची संरचनात्मक मांडणी/फलकाची उभारणी :-** फलकाचीमांडणी किंवा उभारणी सौंदर्यशास्त्रदृष्ट्या आणि शासन किंवा नगरपरिषद / नगरपंचायत लायसनप्राप्त संरचना अभियंत्याने मान्य केलेल्या संरचना आराखड्यानुसार तंतोतंत करण्यात येईल. अनुज्ञात फलक —आकारामध्ये सौदर्यशात्रदुष्ट्या फलक शोभिवंत दिसावा म्हणून सर्व बाजूंनी यथोचित असलेली चौकट समाविष्ट असेल. संरचना चौकट सुरक्षेच्या-दृष्टीने नोंदणीकृत संरचना अभियंत्याने दिलेल्या आराखड्यानुसार व आवश्यक खांबाच्या आधारावर उभारली जाईल. फलकाचे सर्व खांब आणि फलकाचा पृष्ठभाग सुशोभितपणे आच्छादण्यात येतील.

**८. फलकाची संरचनात्मक मजबुती :-** (क) एखाद्या इमारतीची संरचनात्मक मजबुतीच्या दृष्टीने तपासणी करण्यात आल्यावर आणि शासन अथवा नगरपरिषद / नगरपंचायत लायसनप्राप्त संरचना अभियंत्यांकडून अशा संरचना मजबुतीबाबत प्रमाणपत्र सादर करण्यात आल्यानंतर त्या इमारतीवर कोणताही फलक उभारण्यास परवानगी दिली जाईल.

(ख) फलक उभारणाऱ्या अभिकरणास अकल्पित दुर्घटनेतून उद्‌भवणार्या दायित्वांबाबत आवश्यक तो विमा सादर करावा लागेल.

(ग) जाहिरात फलकामुळे उद्भवणाऱ्या अकल्पित दुर्घटनेबाबत सर्व दायित्वांची जबाबदारी संबंधीत सक्षम प्राधिकाऱ्याने योग्य ती शाहानिशा करुन ठरवावी. अशा प्रकरणी संबंधीत जाहीरात फलकाच्या मजबुती बाबत प्रश्न उद्भवल्यास संबंधीत अभिकरणाची जबाबदारी राहील.

**९. जाहिरातीचे अनुज्ञेय रंग :-** फलकावर वापरण्यात येणारे रंग हे, वाहतूक सिग्नलच्या चिन्हांमधील आणि फलकांवरील लाल, पिवळा व हिरवा या रंगांशी कोणतेही साधर्म्य असलेले वाहतूक सिग्नल स्पष्टपणे दिसण्यामध्ये अडथळा होईल अशा ठिकाणी कोणताही फलक लावण्यात येणार नाही.

**१०. जाहिरात फलकाची कमाल उंची :-** (क) जमिनीवर फलक उभारण्यात येईल तेंव्हा, फलकाचे टोक म्हणजे त्याची कमाल उंची ही, तलीय सूट अंतर धरून,त्याखालील जमिनीच्या पृष्ठभागपासून ३० फुटांपेक्षा अधिक असता कामा नये.

(ख) जमिनीवर फलक उभारण्यात येईल तेव्हा, पूलावरून अथवा उड्डाणपुलावरून तो दिसावा म्हणून, जाहिरात फलकाचे टोक म्हणजेच त्याची कमाल उंची ही, ज्या मार्गावरुन दिसनार आहेत त्या पुलाच्या अथवा उड्डाणपुलाच्या रस्त्याच्या पातळीपासून ३० फूट पेक्षा अधिक असता कामा नये.

**११. दोन फलकांमधील किमान अंतर :-** (क) रस्त्याच्या बाजुच्या दोन फलकांमधले किमान अंतर हे १० मीटरपेक्षा कमी असता कामा नये. हे नियम पूर्वलक्षी प्रभावाने लागू होणार नाहीत.

(ख) दोन जाहिरात फलकांमधील अंतर किमान १० मीटर्स असावे म्हणजे रस्त्याच्या/ ओळीच्या त्याच एका बाजूच्या जमिनीवरील दोन जाहिरात फलकांमधील अंतर किमान १० मीटर्स असेल. हे अंतर, जाहिरात फलकांच्या बाहेरील कडेपासून मोजण्यात येईल. अंतराबाबतचे नियम है, फक्त जमीन ते जमीन जाहिरात फलकांसाठी लागू असतील. हे नियम केवळ नविन परवानगी द्यावयाच्या जाहिरात फलकांसाठी लागू असतील. हे नियम नगरपरिषद/नगरपंचायतीच्या जमीन/रस्ता/पादचारी मार्ग/इतर मालमत्ता यांवर नगरपरिषद/नगरपंचायतीने उभारलेल्या बहुसंख्य लोकहितासाठी, नागरी संदेश निर्देशात्मक चिन्ह (संकेत) इत्यादीकरीता प्रदर्शित करण्यासाठी उभारलेल्या फलक यांच्यासाठी लागू असणार नाहीत.

(ग) पाठपोट (सॅण्डविच) फलकाच्या बाबतीत आणि एका वर एक असलेल्या फलकांसाठी, किमान अंतराचे प्रमाणक लागू असणार नाही.

**१२. फलकाचे प्रक्षेपण :-** (क) मोकळ्या मैदानाच्या बाबतीत, जर तेथे पदपथ नसेल तर, फलक, सडकरेषेच्या वाहनमार्गापर्यंत पुढे आणण्यास परवानगी देण्यात येणार नाही.

(ख) मोकळ्या मैदानावरील फलक पदपथापर्यंत पुढे आणण्यास परवानगी देण्यात येणार नाही.

**१३. रेल्वेच्या जागेवरील फलक:-** (क) रेल्वेच्या जागेत अथवा स्थानकांमध्ये लावलेल्या किंवा पुढील प्रवर्गात मोडणाऱ्या जाहिराती या नियमाच्या अंतर्गत विनियमन करण्यास पात्र नसतील,-

(एक) रेल्वेने रेल्वेच्या जागेवर अथवा स्थानकांमध्ये लावलेली (त्यांच्या कामकाजासंबंधीची असेल तरी ती), कोणत्याही रस्त्यावरून दिसेल अशी किंवा त्या रस्त्याकडे तोंड करून असेल अशी जाहिरात किंवा भित्तीरंगचित्र, आणि

(दोन) खाजगी किंवा बिगर-रेल्वे अभिकरणाने रेल्वेच्या जागेवर, स्थानकावर अथवा जमिनीवर लावलेली रस्त्यावरून न दिसणारी जाहिरात किंवा भित्तीरंगचित्र.

(ख) रेल्वेच्या जागेवर फलक लावण्यासाठी परवानगी घेण्याकरिता, अभिकरणांस रेल्वे प्राधिकरणाकडून ना-हरकत प्रमाणपत्र मिळविल्यानंतर, विहीत रितीने नगरपरिषद /नगरपंचायतीच्या सक्षम प्राधिकाऱ्याकडे अर्ज करावा लागेल.

(ग) रेल्वे प्राधिकाऱ्यांनी त्यांच्या जागेत लावण्यास परवानगी दिलेले सर्व जाहिरात फलक हे, महानगरपालिकेकडून ना-हरकत प्रमाणपत्र/परवानगी मिळण्याकरिता या नियमांच्या तरतुदीं अनुसार असले पाहिजेत.

(घ) जाहिरात फी साठीची मागणी नोटीस नगरपरिषद /नगरपंचायतीच्या वेळापत्रकानुसार संबंधित जाहिरात अभिकरणास पाठविण्यात येईल. संबंधित रेल्वे प्राधिकाऱ्यांनी अभिकरणाचे नाव, त्यांच्या जागेवर लावावयाच्या फलकाचे ठिकाण, आकार, दिलेला कालावधी व अन्य सर्व तपशील पुरविणे आवश्यक आहे.

(ड) असे असले तरी, कोणत्याही माननीय न्यायालयाच्या निदेशांनुसार अथवा जेथे महानगरपालिकेने फलकांस परवानगी दिलेली नसेल त्याबाबतीत, फलक काढण्याची जबाबदारी रेल्वे प्राधिकरणावर असेल.

**१४. अन्य सार्वजनिक प्राधिकरणांच्या जागेवरील फलक : -** (क) शासकीय, निम-शासकीय जसे भारतीय आंतरराष्ट्रीय विमानतळ प्राधिकरण, संरक्षण मंत्रालय, सार्वजनिक क्षेत्रातील उपक्रम यांसारख्या अन्य सार्वजनिक प्राधिकरणांच्या जमिनीवर अथवा जागेवर फलक उभारण्यास इच्छुक असलेल्या अभिकरणांना संबंधित प्राधिकरणाकडून वैध परवाना किंवा ना हरकत प्रमाणपत्र मिळविणे आवश्यक आहे. संबंधित प्राधिकरण आणि इच्छुक अभिकरणास या नियमांच्या अंतर्गत विनियमन करणे बंधनकारक राहील.

(ख) जाहिरात फी साठीची मागणी नोटीस नगरपरिषद /नगरपंचायतीच्या वेळापत्रकानुसार संबंधित जाहिरात अभिकरणास पाठविण्यात येईल. संबंधित रेल्वे प्राधिकाऱ्यांनी अभिकरणाचे नाव, त्यांच्या जागेवर लावावयाच्या फलकाचे ठिकाण, आकार, दिलेला कालावधी व अन्य सर्व तपशील पुरविणे आवश्यक आहे.

**१५. तरंगत्या फुग्यांद्वारे जाहिराती झळकाविण्याकरिता विशेष मानके :-** खालील शर्तींच्या अनुपालनाच्या अधीनतेने, तरंगत्या फुग्यांच्या माध्यमातुन प्रकाशीत किंवा अप्रकाशीत जाहिरातींना परवानगी देता येईलः-

(क) इतर जाहिराती दिसण्यामध्ये आड येणार नाही अथवा अडथळा करणार नाही अशा रितीने अभिकरण जाहिरात फुगा प्रदर्शित करील.

(ख) अभिकरण, फुग्याच्या माध्यमातुन उक्त जाहिरात प्रदर्शित करताना कोणतीही आकस्मिक परिस्थिती उद्भवल्यास त्याबाबतीत फुग्यावर देखरेख ठेवण्यासाठी आवश्यक ती सर्व व्यवस्था करील.

(ग) अभिकरण, आवश्यक असेल तेव्हा, भारत सरकारच्या नागरी विमानचालन विभागाकडून मिळविलेले ना-हरकत प्रमाणपत्र सादर करील आणि त्यांचे सर्व नियम व विनियम यांचे पालन करील.

(घ) असा जाहिरात फुगा तरंगत ठेवल्यामुळे किंवा त्याबाबतीत वापरण्यात आलेले कोणतेही साहित्य, वायू वा साधन तरंगत ठेवल्यामुळे अथवा उक्त फुगा वा त्याचा कोणताही भाग, वादळ, चुकीची बांधणी, हयगय, अपघात किंवा अन्य कोणत्याही कारणाने पडल्यामुळे अथवा अन्य कारणामुळे कोणत्याही मालमत्तेस किंवा व्यक्तीस झालेल्या कोणत्याही अपघाताबद्दल अथवा कोणत्याही दुखापतीबद्दल नुकसान भरपाई देण्यास अभिकरण जबाबदार असेल.

**१६. व्यवसायाच्या ठिकाणी जाहिरात प्रदर्शित करण्याकरिता विशेष प्रमाणके:-** व्यवसायाच्या ठिकाणी प्रकाशित केलेले प्रदीप्त जाहिरात फलक किंवा निऑन-नामफलक यासारख्या जाहिरात फलकांना अधिनियमामध्ये व या नियमांमध्ये निर्धारित केलेल्या तरतुदींनुसार परवानगी दिली जाईल आणि ते विनियमित केले जातील. व्यवसायाच्या ठिकाणी प्रदीप्त जाहिरात फलक आणि प्रकाशित केलेले निऑन-नामफलक यांसारखे जाहिरात फलक प्रदर्शित करण्यास, यापुढे दिलेल्या शर्तींच्या अनुपालनाच्या अधिनतेने तसेच राष्ट्रीय भवन संहितेच्या भाग दहा-जाहिरात फलक व बहिःस्थ जाहिरात संरचना याच्या अनुपालनाच्या अधिनतेने परवानगी देता येईल. मॉल, बिग बजार, खरेदी केंद्रे (शॉपिंग सेंटर्स), रूग्णालये, बँका, सिनेमागृहे इत्यादींवरील बृहत फलकांवरील बहुविध जाहिरातींबाबत अपवाद देखील करता येईल.

(क) कोणत्याही प्रकाशित फलक वाहतुकीच्या सिग्नलच्या चिन्हापासून १० मीटर एवढ्या समस्तर अंतराच्या आत कोणताही लाल, पिवळा अथवा हिरव्या रंगातील प्रकाशित फलक उभारण्यात किंवा ठेवण्यात येणार नाही. दोन मजल्यांपेक्षा कमी किंवा पदपथाच्या ६ मीटरवर, यांपैकी जी अधिक असेल तेवढ्या उंचीवर पांढऱ्या दिव्याव्यतिरिक्त अन्य रंगाच्या दिव्याने प्रकाशित केलेल सर्व जाहिरात फलक कोणत्याही वाहतूक नियंत्रण फलकाला अथवा सिग्नलला अडथळा येणार नाही, अशा तऱ्हेने प्रदर्शित करण्यात येतील.

(ख) कोणतीही व्यक्ती, एखाद्या जाहिरात फलकातील प्रखर रोषणाईमुळे त्यालगतच्या किंवा आसपासच्या निवासी इमारतींमधील रहिवाशांना त्रास होईल असा कोणताही फलक उभारणार नाही. अशा उभारणीकरिता कोणतीही परवानगी दिलेली असली तरी, तो उभारल्यानंतर लगतच्या किंवा आसपासच्या निवासी इमारतींमधील रहिवाशांना त्रास होईल इतक्या प्रखर रोषणाईचा असल्याबद्दल प्राधिकरणाचे मत झाल्यास, प्राधिकरण विनिर्दिष्ट करील अशा वाजवी

कालावधीच्या आत संबंधित जागेचा मालक प्राधिकरणाच्या आदेशानुसार त्यामध्ये यथोचित सुधारणा करील किंवा तो नोटीस देऊन काढून टाकील.

(ग) प्राधिकरणाच्या मते सार्वजनिक सुविधा, आरोग्य व सुरक्षितता यांच्या प्रयोजनार्थ चालू ठेवणे आवश्यक असतील अशा फलकांव्यतिरिक्त कोणतेही विद्युत फलक रात्री ११ नंतर चालू ठेवण्यात येणार नाहीत.

(घ) कोणत्याही इमारतीमध्ये सर्रास प्रवेशास अथवा तेथून निर्गमास अडथळा येईल अशा प्रकारे जमिनीवरील कोणताही फलक उभारण्यात येणार नाही.

(ड) कोणताही प्रक्षेपण फलक अथवा त्याच्या आधाराचा वा चौकटीचा कोणताही भाग त्या भूखंडाच्या सीमा रेषेच्या भितीच्या पुढे वाढविण्यात येणार नाही.

(च) व्यवसायाच्या जागेत, त्या ठिकाणी विक्री करावयाच्या उत्पादनांशी अथवा दिल्या जाणाऱ्या सेवेशी संबंधितच जाहिरात लावण्यास परवानगी देता येऊ शकेल.

**१७. नवीन (प्रारंभिक) जाहिरात फलकाची परवानगी मिळविण्यासाठीची कार्यपध्दती :-**

(क) कोणत्याही प्रकारचा फलक अथवा जाहिरात अथवा आकाश-चिन्ह अथवा जाहिरात फुगा अथवा किऑस्क इत्यादी उभारण्यास इच्छुक असणारे कोणतेही अभिकरण, त्याबाबत परवानगी मिळविण्यासाठी, प्रति अर्ज विहित संस्करण फी सह, यासोबत जोडलेल्या नमुना-क मध्ये अर्ज करील. सक्षम अधिकाऱ्याने अभिकरणाच्या प्रस्तावित फलकाच्या उभारणीसाठी योग्य त्या कागदपत्रांची पडताळणी करून मान्यता दिल्यावर नगरपरिषद/नगरपंचायत अभिकरणास सदर फलक परवाना फी चे चलन देईल. त्याचा भरणा अभिकरणाने १५ दिवसाच्या आत भरणे बंधणकारक आहे. त्यानंतर मान्यता प्राप्त संरचनेची (स्ट्रक्चर) उभारणी केल्यावर नगरपरिषद/नगरपंचायतीच्या सक्षम अधिकाऱ्याने तपासणी करून त्याचे स्वीकृत पत्र दिल्यावरच अभिकरणाला सांकेतिक क्रमांक प्रदान करण्यात येईल. त्या सांकेतिक क्रमांकासह सदर अधिकृत संरचनेवर अधिकृत जाहिरात लावता येईल. त्यानंतर अभिकरणास सदर फलकासाठी परवाना (फॉर्म-सी) दिला जाईल. यापैकी कोणत्याही अटीचा भंग झाल्यास सदर प्रस्ताव नोटीस देऊन रद्द करण्यात येईल.

(ख) अर्जासोबत पुढील दस्तऐवज जोडण्यात येतील : -

(एक) जिच्यावर जाहिरात प्रदर्शित करण्याचे प्रस्तावित असेल त्या जमिनीच्या/इमारतीच्या मालकाकडून घेतलेले “ना-हरकत प्रमाणपत्र”;

(दोन) ज्या जमिनीवर जाहिरात करावयाची आहे ती जमीन नगरपरिषद /नगरपंचायत, शासन, बंदर विश्वस्त व्यवस्था, महाराष्ट्र गृहनिर्माण व क्षेत्र विकास प्राधिकरण, मुंबई महानगर प्रदेश विकास प्राधिकरण इत्यादींसारख्या सार्वजनिक प्राधिकरणांकडून भाडेपट्टयाने देण्यात आलेली असेल तर, पट्टाकाराचे (lessor) ना-हरकत प्रमाणपत्र देखील आवश्यक आहे;

(तीन) इमारतीच्या गच्चीवरील फलकाबाबत, सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सर्वसाधारण सभेच्या मान्यतेने दिलेले ना-हरकत प्रमाणपत्र आवश्यक आहे किंवा अन्य बाबतीत इमारतीतील सभासदांपैकी किमान २/३ सहमतीने दिलेले ना - हरकत प्रमाणपत्र आवश्यक असेल.

(चार) सहकारी गृहनिर्माण संस्थेचे ना-हरकत प्रमाणपत्र असेल तर, सहकारी गृहनिर्माण संस्थेच्या सर्वसाधारण सभेच्या बैठकीमध्ये रीतसर मंजूर केलेल्या ठरावाची प्रमाणित केलेली प्रत;

(पाच) प्रस्तावित जाहिरात उभारण्याचे ठिकाण दर्शविणाऱ्या आधारभूत नकाशांच्या संरचना अभियंत्यांने साक्षांकित केलेल्या दोन प्रती.

(सहा) प्रस्तावित जाहिरात स्थळाची आखणी व रंगयोजना आणि त्याचे नेमके स्थान दर्शविणारे रेखाचित्र तसेच बाह्य प्रकाश व्यावस्थेसह संगणकनिर्मित संकल्पचित्र यांच्या दोन प्रती;

(सात) प्रस्तावित जाहिरात स्थळावरील प्रस्तावित फलकाच्या चिन्हांकनासह त्या स्थळाची १० × ८ इंच आकाराची दोन छायाचित्रे;

(आठ) त्या स्थानामध्ये ४० मीटरच्या आत एकाच रांगेत कोणतीही झाडे किंवा अन्य कोणताही फलक अस्तित्वात असल्याचे, त्यांच्या आकारासह दर्शविणाऱ्या, त्या स्थानाच्या नकाशाच्या २ प्रती;

(नऊ) आवश्यकता असल्यास, पोलीस (वाहतूक) विभागाच्या सक्षम अधिकारी आणि नगरपरिषद /नगरपंचायतीचा उद्यान विभाग यांच्याकडून सक्षम प्राधिकारी ना-हरकत प्रमाणपत्र मागवतील.

(दहा) जेथे जेथे आवश्यक असेल तेथे तेथे, भारत सरकारच्या नागरी विमानचालन विभागाचे ना-हरकत प्रमाणपत्र;

(अकरा) लायसन्स प्राप्त संरचना अभियंत्याने मान्य केलेला संरचनात्मक मांडणी किंवा आराखडा.

(बारा) ज्या इमारतीवर जाहिरात उभारावयाची असेल त्या इमारतीचे, लायसनप्राप्त संरचना अभियंत्याचे संरचना-मजबुती प्रमाणपत्र आणि फलकाच्या संरचनेचे संरचना-मजबुती प्रमाणपत्र;

(तेरा) महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनियम, २०१७ अन्वये नोंदणी प्रमाणपत्र ( Shop Act Certificate) व सेवा कर नोंदणी प्रमाणपत्र (General Service Tax Certificate).

**१८. व्यवसायाच्या जागेत रोषणाई केलेले फलक, प्रकाशित जाहिरात फलक, निऑन फलक इ. माध्यमांतून जाहिरातीस परवानगी मिळविण्याकरिताच्या अर्जासोबत सादर करावयाचे दस्तऐवज :-**

(क) व्यवसायाच्या जागेची ना हरकत प्रमाणपत्र भाडे-पावती किंवा त्या जागेच्या कायदेशीर व प्रत्यक्ष ताब्यासंबंधातील अन्य कोणताही दस्तऐवज किंवा महाराष्ट्र दुकाने व आस्थापना अधिनीयम, २०१७ अन्वये केलेली नोंदणी प्रमाणपत्राची प्रत;

(ख) जाहिरातफलकाचा आकार, तसेच त्यांवर प्रदर्शित करावयाच्या मजकुराचा तपशील यांसह त्या फलकाचे रेखाचित्र.

**१९. तात्पुरती जाहिरात परवानगीकरिता अर्ज :-**

(क) तात्पुरती जाहिरात परवानगीकरिता, जसे की फलक, कमानी, पथनाट्यप्रदर्शन, इमारत वेष्टने, जाहिरात फुगे इत्यादींच्या माध्यमातुन तात्पुरती जाहिरात करण्याकरिताचा अर्ज, सर्वसाधारण विहित अशा संस्करण फी सह विहीत नमुन्यात (नमुना-क) सक्षम प्राधिकाऱ्याकडे करावा. तात्पुरती जाहिरात फलकासाठी नगरपरिषद/नगरपंचायतीने विनिर्दिष्ट केलेल्या जागांवर तीन दिवसांपेक्षा अधिक नाही. व '६ लांबी × ३ उंची' किंवा '८ लांबी × ३ उंची' किंवा '८ लांबी × ६ उंची' पेक्षा अधिक आकाराचे नसलेल्या फलकांनाच परवानगी देण्यात येईल. तसेच तात्पुरती जाहिरात फलकानी अस्तित्वात असलेले कायमस्वरूपी जाहिरात फलक दिसण्यामध्ये अडथळा करता येणार नाही.

(ख) अर्जदार, कार्य अथवा प्रयोजन पूर्ण झाल्यानंतर लगेचच जाहिराती काढुन टाकण्याची व्यवस्था करील, जो अवधी सामान्यतः ३ दिवसांपेक्षा अधिक असता कामा नये. तशी माहिती मिळाल्यानंतर, प्रतिभूती ठेवीची रक्कम कोणत्याही शर्तीचा भंग केल्याबद्दल समपहरण केलेली नसेल तर, परत करण्यात येईल.

(ग) फिरती वाहने, स्थिर वाहने व सायकलींवर करण्यात येणाऱ्या जाहिरातीवर विहित शुल्क आकारण्यात यावे.

**२०. जाहिरात परवान्यांकरिता शुल्क :-**

(क) परवाना शुल्क निश्चित करण्याच्या संदर्भात, महाराष्ट्र नगरपरिषद/नगरपंचायत व औद्योगिक वसाहत अधिनियमातील तरतूदीनुसार मुख्याधिकारी नगरपरिषद/नगरपंचयातींच्या मंजूरीने वेळोवेळी निश्चित करतील असे परवाना शुल्क जारी करण्यासाठी लागणाऱ्या खर्चाच्या वाजवी मर्यादेपेक्षा जास्त नसावे. जाहिरातीकरिता भाडे आकार, परवाना शुल्क हे अभिकरणांकडून नगरपरिषद/ नगरपंचायतीने वेळोवेळी मंजूर केलेल्या दरानुसार गोळा करण्यात येईल. सदरचे परवाना शुल्क आकारामधील वाढ दर ३ वर्षांनंतर चलन वाढ दरानुसार निश्चित करावी. अभिकरण परवानगी संपण्याच्या १० दिवस अगोदर महानगरपालिकेला अग्रीम म्हणून जाहिरात फलक खाजगी जागेवर असल्यास ६ महिन्यांचे परवाना शुल्क आणि नगरपरिषद/नगरपंचायतीच्या जागेवर असल्यास ६ महिन्याचे भाडे आणि ६ महिन्याचे परवाना शुल्क आगाऊ प्रदान करतील. तोपर्यंत सदरचे फलक पुढील निर्णय होईपर्यंत कार्यरत राहतील.

(ख) जर शुल्क विहीत करण्यात आलेल्या काळात प्रदान करण्यात आले नाही तर, ३ महिन्याच्या विलंबाकरिता परवाना शुल्काच्या १० टक्के रकमेइतकी आणि ६ महिन्यांच्या विलंबाकरिता २५ टक्के रकमेइतकी आपसमेळाची रक्कम देय असेल. ६ महिन्यांच्या पुढे होणाऱ्या विलंबाकरिता परवाना रद्द करण्यात येईल.

(ग) अभिकरणाकडून वर्षातील १५ दिवसांच्या कालावधीकरिता, नगरपरिषद /नगरपंचायतीकडून जसजसे निर्देश देण्यात येईल त्याप्रमाणे एखादा नागरी संदेश जो सार्वजनिक हितास्तव प्रक्षेपित करणे अनिवार्य असेल, त्यासाठी जाहीरात फलक रिकामा असल्यास/ नजिकच्या कालावधीत रिकामा होणार असेल, ज्यासाठी कोणतेही शुल्क देय असणार नाही.

(घ) जाहिरात परवान्याच्या नुतनीकरणाच्या वेळी, अभिकरण, सक्षम प्राधिकरणाचे पृष्ठांकन घेण्याकरिता परवाना सादर करील आणि आवश्यक ते शुल्क रोख रकमेत, प्रदानादेश (पे-ऑर्डर) किंवा दर्शनी धनाकर्ष (डिमांड ड्राफ्ट) किंवा इ पेमेंट मध्ये प्रदान करील. जर प्रदान धनादेशाच्या स्वरूपात करण्यात आले असेल तर, धनादेश वटल्यानंतरच केवळ परवान्याचे नुतनीकरण करण्यात येईल. वृक्षांचे संवर्धन किंवा नगरपरिषद /नगरपंचायतीच्या पदपथावरील प्रक्षेपण यामुळे प्रतिभूती ठेव अंशतः किंवा पूर्णतः समपहरण केली असेल तर, अशा समपहरणामुळे येणारी तूट ही सुद्धा परवान्याचे नुतनीकरण करण्यापूर्वी, जर तो रद्द करावयाचे ठरवले नसेल तर, भरून काढण्यात येईल.

(च) नवीन जाहिरात फलक उभारताना, जाहिरात फलकाच्या दर्शनी बाजूला नगरपरिषद /नगरपंचायतीच्या पदपथावरील २५ मीटर्सच्या अंतरापर्यंत अस्तित्वात असलेले वृक्ष राखणे, त्यांचे संवर्धन व संरक्षण नगरपरिषद /नगरपंचायतीमार्फत करण्यासाठी आणि या शर्तीचे निष्ठापूर्वक पालन करण्यासाठी, अभिकरणाने, अस्तित्वात असलेल्या अशा प्रत्येक वृक्षासाठी प्रतिभूती ठेव म्हणून रु.२,५००/- ठेव म्हणून ठेवणे आवश्यक असेल. तसेच जाहिरात फलकाच्या २५ मीटर अंतरातील वृक्ष जर पुनर्स्थापन करायचे असतील तर तर सक्षम प्राधिकरणाच्या मान्यतेने इतरही जातीच्या वृक्षांची पुनर्स्थापना करता येईल. अशा पुनर्स्थापनेच्या वृक्षासाठी संवर्धन शुल्क रु. २,५००/- प्रत्येक वृक्षासाठी भरणे आवश्यक असेल. ”

(छ) जाहिरात अभिकरण (एजन्सी) जर चांगल्या दृश्य मान्यतेसाठी शाखेची छाटणी करून /जाहिरात होर्डिंग समोरील झाडाची छाटणी करण्याची इच्छा ठेवत असतील तर त्यांना उद्यान विभागाकडून ना-हरकत मिळेल. वृक्ष संवर्धन अधिनियमानुसार उद्यान विभाग झाडांच्या छाटनीसाठी विहित शुल्क वसूल करेल.

(ज) नगरपरिषद/नगरपंचायतीत सध्या अस्तित्वात असलेल्या जाहिरात फलकांसमोर उंच जातीची झाडे लावण्याची परवानगी देणार नाहीत.

**२१. व्यवयासाच्या जागेवरील नवीन अथवा प्राथमिक जाहिरात यासारख्या इतर जाहिरातींच्या परवान्याकरिता शुल्क व ठेवी:-** (क) परवाना मिळाल्यावर,अभिकरण, परवानगी मंजूर झाल्याच्या दिनांकापासून दहा दिवसांच्या आत सक्षम प्राधिकारी ठरवतील त्यानुसार अग्रीम देण्यास पात्र राहील. असे वार्षिक जाहिरात शुल्क प्रदान करण्यासाठी पात्र असेल. अभिकरणास, परवाना मिळाल्यापासून दहा दिवसांचे आत परवाना अटी व शर्तीचे विश्वासाने पालन करण्यासाठी, एका महिन्याच्या जाहिरात शुल्काएवढी रक्कम जमा करावी लागेल. कोणत्याही अटीचा वा शर्तीचा भंग झाल्यामुळे जर, जमा केलेली रक्कम अंशतः किंवा पूर्णतः समपहरण केल्यास, त्यापरिणामी ठेवीमध्ये येणाऱ्या तुटीची १५ दिवसांमध्ये भरपाई करावी लागेल. अशा परवान्याचे नुतनीकरण, परवान्याची मुदत संपण्यापूर्वी १० दिवसांच्या आत, आधीच करण्यात येईल.

(ख) वेष्टने, फुगे फुगवून केलेल्या जाहिराती, पथनाट्ये (रोड शोज), राजकीय पक्षाकडून दाखविले जाणारे कार्यक्रम, धार्मिक किंवा शैक्षणिक संस्था किंवा वाणिज्यिक आस्थापना, यासारख्या तात्पुरत्या परवान्यांच्या बाबतीत, अभिकरणास उक्त परवाना दिल्यानंतर लगेचच, नगरपरिषद /नगरपंचायती कडून ठरविण्यात आलेले शुल्क आणि ठेवी प्रदान कराव्या लागतील.

**२२. परवानाधारक अभिकरणाची कर्तव्ये व जबाबदाऱ्या :-** (क) परवानाधारक, संरचना इमारत व जाहिरात फलक हा सौंदर्यशास्त्रदृष्ट्या संकल्पित केलेला, आखणी केलेला व सदैव यथोचितरित्या सुस्थितीत आहे याची सुनिश्चिती करील. तसेच जाहिरात फलकाची संरचना व जाहिरात फलकाची पाठीमागील बाजू गडद हिरव्या रंगाचा मुलामा देऊन रंगविण्यात येईल.

(ख) अश्लील किंवा कोणतेही इतर घाणेरडे आक्षेपार्ह संदेश प्रदर्शित करणाऱ्या जाहिराती प्रदर्शित करण्यात आलेल्या नाहीत, तसेच तंबाखू उत्पादने यांच्याशी संबंधित असणारे कोणतेही आक्षेपार्ह संदेश किंवा जाहिराती किंवा मद्यविषयक जाहिराती थेट किंवा तशाच प्रकारच्या दुय्यम जाहिराती जाहिरात फलकावर प्रदर्शित करणार नाहीत (भारतीय दंड संहितेमध्ये व्याख्या केल्याप्रमाणे) याची परवानाधारकाने खात्री करावी.

(ग) जाहिरात फलकामार्फत जाहिरात प्रदर्शित करणारे अभिकरण, अभिकरणाची ओळख पटविणे सोईचे व्हावे यासाठी योग्य त्या आकारातील त्याच्या नावाची पट्टी आणि जाहिरात फलकाचा त्याला देण्यात आलेला अनुक्रमांक, जाहिरात फलकाच्या कोपऱ्यात दिलेल्या जागेत प्रदर्शित करील किंवा लावील. अभिकरण, परवान्याची मुदत संपण्याचा महिना व वर्षही प्रदर्शित करील.

(घ) सक्षम प्राधिकरणाच्या परवानगी शिवाय फांद्या कापणे, झाडे तोडणे, सुबकरित्या कापणे छाटणे यासारख्या अपराधाकरिता महाराष्ट्र (नागरी क्षेत्रे) झाडांचे संरक्षण व जतन अधिनियम, १९७५ मध्ये सुचविलेल्या कोणत्याही दंडात्मक कारवाईबरोबरच सक्षम प्राधिकरण, ठेवीमधील काही भाग किंवा पूर्ण ठेव समपहरण करील आणि त्याबरोबरच अभिकरणाला दिलेली परवानगी आपोआपच रद्द झाल्याचे मानण्यात येईल. दुसऱ्या वेळी प्रतिभूती ठेवीचे अंशतः होणारे समपहरण हे परवानगी आपोआपच रद्द होण्यातही होईल. परंतु धोकादायक फांद्या कापणे किंवा झाडाचा विस्तार कमी करावयाचा असल्यास सक्षम प्राधिकरणाची परवानगी घेणे बंधनकारक असेल.

(ङ) परवानाधारकास, दारूची किंवा तंबाखू आणि तंबाखूशी संबंधित उत्पादने यांची कोणतीही जाहिरात प्रदर्शित करण्यास प्रतिबंध करण्यात येत आहे.

**२३. जाहिरातीच्या परवान्याचे नुतनीकरण:-** (क) अर्जदार अभिकरण, परवान्याच्या नुतनीकरणासाठी दर तीन वर्षानंतर विहीत केलेल्या नमुना "ब" मध्ये नगरपरिषद /नगरपंचायतीने नेमलेल्या सक्षम प्राधिकरणाकडे अर्ज करील. सक्षम अधिकाऱ्याकडून नुतनीकरणास मान्यताप्राप्त अर्जदारांना जाहिरात फी साठीची मागणी नोटीस अभिकरणास पाठविण्यात येईल. जाहिरात फलक मान्यता मिळाल्यानंतर सक्षम अधिकाऱ्यांने विहित कालावधीत नमुना “क” प्रमाणे परवाना देणे बंधनकारक राहील.

(ख) नुतनीकरणाच्या अर्जाबरोबर पुढील दस्तऐवज जोडण्यात येतील:-

(एक) मिळकतीच्या/जमिनीच्या मालकाच्या/नगरपरिषद/नगरपंचायतीच्या किंवा अन्य सार्वजनिक प्राधिकरणाच्या सक्षम प्राधिकाऱ्याचे ना-हरकत प्रमाणपत्र;

(दोन) कोणत्याही लायसनप्राप्त संरचना अभियंत्याचे संरचना मजबूतीचे (स्थिरतेचे) प्रमाणपत्र;

(तीन)जाहिरातफलकाच्या १०" x ८" च्या छायाचित्राच्या दोन प्रती.

(चार)नगरपरिषद/नगरपंचायतीने जाहिरात फलकासाठी दिलेल्या परवाना (फॉर्म- “क”) प्रत.

**२४. जाहिरात परवान्याचे हस्तांतरण, परवाना रद्द आणि थकबाकी वसूल करण्याची कार्य पद्धती :-**

जाहिरात फलकाच्या परवान्याचे सक्षम प्राधिकरणाच्या पूर्ण परवानगीने आणि पुढील बाबीस अधीन राहून, वेळोवेळी नगरपरिषद /नगरपंचायतीने विहित केलेल्या हस्तांतरण शुल्काचे प्रदान केल्यानंतर, हस्तांतरण करता येऊ शकेल,-

क) अभिकरणाची लेखी संमती, म्हणजे परवानगी/परवान्याचा धारक आणि जमिन मालकी प्राधिकरण/सहकारी संस्था;

ख) कायदेशीर हस्तांतरणाच्या बाबतीत, मूळ मालकाच्या मृत्युचे प्रमाणपत्र आणि कायदेशीर उत्तराधिकारी किंवा कायदेशीर वारस यांचा पुरावा आणि इतर कायदेशीर वारसांकडून ना-हरकत प्रमाणपत्र;

ग) इतर सर्व मागणीदारांसाठी क्षतिपूर्ती करण्याबाबत मुख्याधिकारी यांचे शपथपत्र;

घ) विक्रीव्दारे हस्तांतरणाच्या बाबतीत, विक्रीचे दस्तावेज आणि खरेदीदाराकडून नगरपरिषद /नगरपंचायतीच्या सर्व दाव्यांमधून क्षतिपूर्ती केल्याचे क्षतिपूर्ती बंधपत्र.

ङ) जाहिरात परवाना रद्द करण्याची कार्य पद्धती : (१) जर अभीकरणास जाहिरात फलकाचा परवाना रद्द करावयाचे असल्यास अभिकरणाने सक्षम अधिकाऱ्याकडे अर्ज करावा. (२) सक्षम अधिकाऱ्यांने समक्ष जागेची पाहणी करावी आणि सदरील फलकाबाबत थकबाकी असल्यास अशी थकबाकी भरून घेऊन सदर फलकाचा परवाना रद्द करावा. (३) परवानाधारकाच्या सर्व ठेवी अटीनुसार सक्षम अधिकाऱ्याकडून तात्काळ परत केल्या जातील.

(च) जाहिरात परवाना थकबाकी वसूल करण्याची कार्य पद्धती :- (१) जर अभिकरणाची इतर कोणत्याही प्रकारची शुल्क अथवा परवाना फी थकबाकी असल्यास व अभिकरण ते भरण्यास असमर्थ असल्यास अथवा टाळाटाळ करत असल्यास सदर शुल्काची वसुली अभिकरणाच्या मालमत्तेतून किंवा जप्ती करून वसूली करण्याचे अधिकार नगरपरिषद / नगरपंचायत मुख्याधिकाऱ्यांचे असतील. (२) अशा अभिकरणास किंवा त्या संस्थेस कोणत्याही प्रकारची परवानगी अथवा नुतनीकरण देता येणार नाही, अशा थकबाकीदार अभिकरणाचे नाव काळया यादीत टाकण्यात येईल.

**२५. अर्ज निकालात काढण्याची कार्यवाही :-**

क) अर्ज सादर करतेवेळी, विहित नमुन्यात भरलेल्या अर्जाची व त्यासोबत जोडलेल्या दस्तऐवजांची सक्षम प्राधिकाऱ्याकडून जो अर्ज स्वीकारील, त्याच्याकडून छाननीपूर्व छाननी करण्यात येईल. जर अर्ज सर्व बाबतीत परिपूर्ण असल्याचे आढळून आले तरच, केवळ तो संस्करण-फीसह स्वीकारण्यात येईल. म्हणून, अर्जदारांना सर्व बाबतीत परिपूर्ण भरलेला अर्ज सादर करणे आवश्यक राहील.

ख) मिळालेल्या प्रत्येक अर्जाची पोचपावती देण्यात येईल आणि त्यावरील निर्णय, अर्ज मिळाल्याच्या दिनांकापासून १५ दिवसांच्या आत अर्जदाराला सक्षम प्राधिकाऱ्याकडून लेखी कळविण्यात येईल. विनिर्दिष्ट केलेल्या कालावधीत जर अशा अर्जावरील निर्णय अर्जदारास कळविण्यात आला नाही तर, परवानगी देण्यात आली आहे असे मानण्यात येईल ( Deemed Sanction).

ग) सक्षम प्राधिकाऱ्याकडून परवानगी देण्यात आल्यावर, नमुना-"क" मधील परवाना देण्यात येईल.

घ) एखाद्या जाहिरातीकरीता तीन वर्षांहून अधिक होणार नाही इतक्या कालावधीसाठी परवानगी देता येईल व नंतर सदर नियमावलीनुसार दर तीन वर्षांनी नुतनीकरण करण्यात येईल.

ङ) जाहिरात फलकाबाबत कोणतीही तक्रार, आक्षेप, वाद उपस्थित झाल्यास सदर जाहिरातदारास वा संबंधित अभिकरणास सक्षम प्राधिकरणामार्फत लेखी स्वरुपात १५ दिवस मुदतीची नोटीस दिली जाईल. त्यानुसार संबंधित परवानाधारक अभिकरणाचा लेखी खुलासा विचारात घेऊन एक महिन्याच्या आत निर्णय घेणे सक्षम प्राधिकरणावर बंधनकारक राहील.

**२६. अपील प्राधिकारी :-** क) मुख्याधिकारी यांनी घेतलेल्या निर्णयाविरुध्दचे अपील जिल्हाधिकाऱ्याकडे दाखल करण्यात येईल.

ख) जिल्हाधिकारी यांनी दिलेला निर्णयाविरुध्द विभागीय आयुक्तांकडे अपिल दाखल करण्यात येईल.

**२७. अपीलाकरिताची कार्यपध्दती :-** (क) कनिष्ठ प्राधिकरणाचा किंवा यथास्थिती वादकारणाचा आदेश मिळाल्यापासून ३० दिवसांच्या आत, नगरपरिषद /नगरपंचायतीकडून विहित करण्यात येईल अशा अपीलाच्या शुल्कासह अपील दाखल करण्यात येईल.

(ख) अपील प्राधिकाऱ्यास, वाजवी कारणासाठी, त्याच्या स्वेच्छानिर्णयानुसार, अपील दाखल करण्याचा ३० दिवसांपर्यंतचा विलंब, क्षमापित करता येईल.

(ग) अपील प्राधिकारी, शक्यतोवर, दोन आठवड्यात अपीलावर निर्णय देईल. या कालावधीत जाहिराती कार्यरत राहतील.

(घ) अर्जदाराने, त्याच वादकारणासाठी, एकाच वेळी, न्यायालयात दाद मागितली असेल तर, अपील आपोआपच फेटाळण्यात आले असल्याचे मानण्यात येईल.

(ङ) कोणत्याही न्यायालयाकडे अपील प्रलंबित असताना, या कालावधीत मा. न्यायालयाने मनाई केली नसल्यास जाहिरात कार्यरत राहतील. जाहिरात फलकाचा मालक किंवा परवानाधारक सक्षम अधिकारी कथित जाहिरात फलकावर मा. न्यायालयाच्या आदेशानुसार कार्यवाही करेल.

**२८.** संबंधीत प्राधिकरण आणि इच्छूक अभिकरण यांना नियमांत कोणत्याही तरतूदीच्या अर्थ विवरणाबाबत शंका उद्भवल्यास/कोणताही बदल करावयाचा झाल्यास अथवा व्यापक स्वरूपाचे बदल करावयाचे झाल्यास त्या बाबतीत शासनाचा निर्णय हा अंतिम असेल.

**२९.** मा.सर्वोच्च न्यायालय/मा.उच्च न्यायालय आणि इतर न्यायालय यांनी दिलेले आदेश या नियमांपेक्षा वरचढ असतील.

**३०.** हे नियम १० वर्षाकरीता किंवा भविष्यात नविन नियमावली लागू होईल यापैकी जे प्रथम अंमलात येईल त्या दिनांकापर्यंत अस्तित्वात राहतील.

**३१.** हे नियम पूर्वलक्षी प्रभावाने लागू होणार नाहीत.

**३२.** जाहिरातदार/अभिकरण (एजन्सी) तसेच सक्षम प्राधिकारी यांनी महाराष्ट्र नगरपरिषद / नगरपंचायत व औद्योगिक वसाहत अधिनियम, महाराष्ट्र मालमत्तेच्या विरुपणास प्रतिबंध करण्याकरीता अधिनियम, १९९५ व इतर संबंधित अधिनियम, नियम, विनियम आणि मार्गदर्शक तत्वे यामधील तरतूदींचे पालन करणे बंधनकारक राहील.

**३३.** जाहिरात लावताना वाहतूकीस तसेच पादचाऱ्यास त्रास होणार नाही, तसेच जाहिरातीच्या संरचनेमुळे कोणतीही दुर्घटना होणार नाही, याबाबत संबंधीत अभिकरणाने(एजन्सी) दक्षता घेणे बंधनकारक राहील. जाहिरातीच्या संरचनेमुळे झालेल्या कोणत्याही अपघातामुळे झालेल्या जीवित/मालमत्तेच्या नुकसानीस संबंधित अभिकरण जबाबदार राहील.

**३४.** जाहिरातीमुळे परिसर विद्रुप होणार नाही याची दक्षता संबंधित अभिकरण व सक्षम प्राधिकाऱ्याने घेणे बंधनकारक राहील.

**३५.** सर्व प्रक्रिया विहित कालावधीत होण्याच्या दृष्टीकोणातून, संपूर्ण प्रक्रिया सुरवातीपासून अखेरपर्यंत उदा. सर्व अर्ज, शुल्क/रक्कमांचा भरणा आणि पुढील पत्रव्यवहार याबाबी 'वन विंडो' पध्दतीनुसार ऑनलाइन प्रक्रियेने राबविण्यात याव्या.

*****

नमुना अ

अर्जाचा नमुना

(नियम १७ पहा)

१. अर्जदाराचे नाव :- ..........................................................................................

२. अभिकरणाचे नाव :- ..........................................................................................

३. दर्जा :- खाजगी मालकीची संस्था/कंपनी/धर्मादाय न्यास/इतर.

४. पत्ता :- ..........................................................................................

..........................................................................................

..........................................................................................

दूरध्वनी क्र. फॅक्स क्र.

५. ज्यासाठी अर्ज केला आहे त्या जाहिरातीचे माध्यम :- प्रकाशित/अप्रकाशित

६. जाहिरातीचा प्रकार :- तात्पुरती/तात्पुरती नसलेली

७. अर्ज केलेल्या जाहिरातीचे स्वरूप :-

८. मोफत निशाण प्रदर्शित करण्यासाठी अर्ज केला आहे का? :- होय /नाही

होय असल्यास,

क) विद्याविषयक/धार्मिक/सामाजिक जनजागृती/आरोग्य/राजकीय/इतर.

ख) कालावधी :- ........................ पासून .................. पर्यंत.

ग) ठिकाण :- एक/अनेक

अनेक असल्यास;-

(एक) ठिकाणांचे क्रमांक :-

घ) मोफत निशाणावरील संदेशाचा मजकूर :- ..........................................

ङ) तुम्हाला जो नागरी संदेश दयायचा आहे, त्या नागरी संदेशाचा प्रवर्ग दर्शवा:-

च) न्यासाच्या नोंदणीची छायाचित्रप्रत सोबत जोडली आहे का? :- होय/नाही.

९. मोजमाप :-

| मोजमाप | चौ.फुट | चौरस मिटर |
| --- | --- | --- |
| लांबी | | |
| रूंदी | | |
| एकूण क्षेत्र | | |
| उंची | | |

१०. स्थान निश्चयनः-

रस्त्याचे नाव :- ..................................................................

- रस्त्याची रूंदी :- ....................................................................
- २५ मीटरच्या आतिल असलेल्या जाहिरात फलकांचा क्रमांक :- ............................................
- रस्त्याच्या प्रत्येक बाजूला २५ मीटरच्या आत असणाऱ्या वृक्षांची संख्या :-...........................
- वृक्ष तोडण्याची आवश्यकता आहे किंवा कसे? :- होय/नाही.

११. जमीन मालकाचे नाव :- ............................................................

१२. जमीन मालकाचे ना-हरकत प्रमाणपत्र सादर केले आहे का? :- होय /नाही.

१३. नियम १७ (ख) नुसार दस्तऐवज सादर करण्यात आले आहेत किंवा कसे? :- होय/नाही

मी, वर दिलेल्या महाराष्ट्र नगरपरिषद/नगरपंचायत (आकाश-चिन्हे व जाहिरात प्रदर्शन नियमन व नियंत्रण) मार्गदर्शक तत्वे, २०२३ च्या तरतुदी काळजीपूर्वक वाचल्या आहेत आणि सर्व शर्तीचे अनुपालन केले आहे. मी दिलेली माहिती खोटी असल्याचे आढळून आल्यास, कायद्यानुसार विहित करण्यात येईल अशा दंडात्मक कार्यवाहीसाठी मी पात्र असेन असे मी मान्य करतो.

दिनांकः- अर्जदाराची स्वाक्षरी

-------------------------------------------

केवळ कार्यालयीन वापरासाठी :-

महाराष्ट्र महानगरपरिषद (आकाश-चिन्हे व जाहिरात प्रदर्शन नियमन व नियंत्रण) नियम, २०२२ च्या नियम २८ अनुसार अर्ज परिपूर्ण आहे किंवा कसे? :- होय/नाही

क) नोंदणी क्रमांक :- ..........................................................................

ख)संस्करण शुल्क :- ..........................................................................

ग) ठेव :- ..........................................................................

घ) अर्ज मिळाल्याचा दिनांक :- ..........................................................................

ड) बोलावण्याचा दिनांक :- ..........................................................................

सक्षम प्राधिकाऱ्याची सही

नमुना ब

(नियम २३ पहा)

**नुतनीकरणाच्या अर्जाचा नमुना**

| | | | |
|---|---|---|---|
| १ | अर्जदाराचे नाव व पत्ता | : | |
| २ | जाहिरातीचा सविस्तर तपशिल | : | |
| ३ | ठिकाण | : | |
| ४ | मंजूर आकार व प्रकार | : | |
| ५ | रोषणाई केलेले(प्रकाशित)/<br>रोषणाई न केलेले(अप्रकाशित) | : | |
| ६ | मागील नूतनीकरण कोणत्या दिनांका पर्यंत केले आहे? | : | |
| ७ | नूतनीकरणाचा पुढील कालावधी | : | |
| ८ | मंजूर जाहिरात फलकाच्या पुढील नूतनिकरणासाठी मालमत्ता धारकाने ना-हरकत प्रमाणपत्र दिले आहे किंवा कसे? | : | |

* नियम २३ (ख) नुसार दस्तऐवज सादर करण्यात आले आहेत/किंवा कसे.

दिनांकः-

अर्जदाराची स्वाक्षरी

नमुना क

(नियम २५(ग) पहा)

परवाना क्रमांकः-

मेसर्स. ........................................................, राहणार .......................................... .....
यांना, याव्दारे ...................................पासून ............................................ पर्यंतच्या कालावधीसाठी महाराष्ट्र नगरपरिषद / नगरपंचायत (आकाश-चिन्हे व जाहिरात प्रदर्शित करण्याचे नियमन व नियंत्रण) मार्गदर्शक तत्वे, २०२२ च्या तरतुदींच्या अनुपालन करण्याच्या अधीनतेने, खाली तपशिलवार दिल्याप्रमाणे आकाश-चिन्ह उभारण्यास प्राधिकार दिले आहेतः-

| आकाश चिन्हाचे स्वरूप | आकाशचिन्हाचे ठिकाण | आकाशचिन्हाचा आकार व क्षेत्र | प्रदर्शनाचा कालावधी | |
|---|---|---|---|---|
| | | | पासून | पर्यंत |
| | | | | |
| | | | | |

अर्जदाराने महानगरपालिकेने विहित केलेल्या दराने चलन क्रमांक. ............................... दिनांक....../....../२०......... व्दारे रूपये......................................... इतके शुल्क प्रदान केले आहे.

दिनांकः- / /

सक्षम प्राधिकारी

नगरपरिषद/नगरपंचायत

जोडपत्र – एक

## जाहिरात फलक उभारण्याकरिता विनिर्देश

(क) प्रस्तावनाः-

या जोडपत्रात नगरपरिषद/नगरपंचायतीच्या अधिकारक्षेत्रात जाहिरात फलक उभारण्यासंबंधातील विनिर्देश व सविस्तर तपशील दिलेला आहे.

(ख) सर्वसाधारणः-

१. जाहिरात फलक गंजू नये म्हणून त्याला वेळोवेळी रंग देऊन यथोचितरीत्या सुस्थितीत ठेवण्यात यावे. त्याच्या सुरक्षिततेसाठी सर्व सांध्यांची नियतकालाने तपासणी करण्यात यावी.

२. नगरपरिषद/नगरपंचयातीचा परवानगी क्रमांक आणि जाहिरात कंपनीचे नाव ठळक ठशात प्रदर्शित करणे अनिवार्य केले आहे. नवीन रोमन अंकात ही अक्षरे काळया रंगाच्या पार्श्वभूमीवर पांढऱ्या रंगाने ६ इंच इतकी मोठी असावीत.

३. जाहिरात फलकांची उभारणी आवश्यक असेल तेथे यंत्राव्दारे उभारणी (साधनांव्दारे)करण्यात यावी आणि कोणताही अपघात होऊ नये यासाठी सर्व सावधगिरीची उपाययोजना करण्यात यावी.

४. जाहिरात फलक उभारल्यामुळे वाहनांच्या व पादचाऱ्यांच्या जाण्यायेण्याच्या,वाहतुकीच्या उपद्रवास किंवा गैरसोयीस प्रतिबंध होण्यासाठी अभिकरण, आवश्यक ती सर्व सावधगिरी घेईल.

(ग) जाहिरात फलकाच्या उंचीची मर्यादा आणि आकारः-

जाहिरात फलक ज्या मार्गांवरून दिसणार आहेत त्या रस्त्याच्या पातळीपासून ४० फूट पेक्षा अधिक उंचीचे जाहिरात फलक उभारले जाणार नाहीत.

(घ) उपद्रव आणि प्रदुषणास प्रतिबंधः-

१. अभिकरण, मालमतेचे मालक लगतचे भाडेकरू किंवा भोगवटादार आणि सर्वसामान्य लोक यांना कोणत्याही प्रकारचा उपद्रव किंवा गैरसोय होण्यास प्रतिबंध करण्याबाबत आणि अशा मालमतेची कोणतीही हानी व (पाण्याचे)प्रवाह व जलमार्ग यांचे कोणत्याही प्रकारे प्रदुषण होण्यापासून प्रतिबंध करण्यासाठी आवश्यक ती सावधगिरी घेईल.

२. अभिकरण, त्याच्या स्वतःच्या खर्चाने आणि नगरपरिषद/नगरपंचायतीच्या समाधानासाठी कामाची अंमलबजावणी करत असताना, रस्ते,पदपथ,पारगामी निःसारण बांधकामे किंवा सार्वजनिक किंवा खाजगी मालमत्ता याचे झालेले कोणतेही नुकसान, मग जो काही खर्च असेल तो, भरून देईल.

३. कोणताही जाहिरात फलक, जेथे तो उभारण्यात आला असेल त्या इमारतीच्या जवळच्या किंवा त्या इमारतीमधल्या किंवा त्याच्या लगतच्या मालमत्तेचे कोणतेही दरवाजे आणि/किंवा खिडक्या यांना चिकटून जाहिरात फलक लावता येणार नाही.

४. जाहिरात फलकाची उभारणी केल्यावर आजूबाजूच्या जागेवरील कचरा किंवा अनावश्यक सामग्री, अभिकरणाकडून स्वच्छ करण्यात येईल.

(च) संरचनात्मक विनिर्देशः-

संरचना चौकट सुरक्षेच्या-दृष्टीने संरचना नगरपरिषद/नगरपंचायत मान्यता प्राप्त अभियंत्याने दिलेल्या आराखड्यानुसार व आवश्यक खांबाच्या आधारावर उभारली जाईल.

(छ) विद्युतीकरण :-

विद्युत अभियंत्याकडून विद्युत उपकरणे विद्युत उपकरणाची मांडणी, दिवे व दिव्यांच्या प्रकाशझोताची तीव्रता तसेच विद्युत उपकरणे व दिव्यांचा दर्जा याबाबतचे प्रमाणपत्र सादर करणे आवश्यक राहील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

C PRIYANKA

Digitally signed by C PRIYANKA
DN: CN = C PRIYANKA, C = IN, S = Maharashtra, O = GOVERNMENT OF MAHARASHTRA, OU = URBAN DEVELOPMENT DEPARTMENT
Date: 2023.06.22 18:20:19 +05'30'

( प्रियांका कुलकर्णी-छापवाले )
शासनाचे उप सचिव

# Annexure “B” (परिशिष्ठ-ब)

## 1. General

(1) These Guidelines may be called the Maharashtra Municipal Councils, Nagar Pachayats (Regulation and Control of the Display of Sky-signs and Advertisement) Guidelines, 2023 **.**

(2) These guidelines shall be apply to the Municipal council, Nagar Panchayat Areas established and constituted under Section 341 (a) (1) of the Maharashtra Municipal Council, Nagar Panchayats and Industrial Urban Act, 1965.

(3) These guidelines shall come into effect from the date of issue.

## 2. Definitions

(1) In this guidelines, unless the context otherwise requires :-

(a) **Advertisement** means and includes any device or representation in any manner such as announcement or direction by word, letter, model, sign by means of posters, hoarding boards, banners, temporary arches, illuminated signs, name boards, direction boards, digital boards, sky sign, placard, digital, LED, LCD, Backlit Board, Neon Display, Electronic display, Video Display, Laser Show. Balloons etc., placed on any private/ public/ State Government/Central Government/ Public Sector Undertaking Government Companies/Government Authorities etc. Land/spaces around the building/terrace/structures/land surrounding the building / Parapet visible from any street for the purpose of commercial exploitation or for publicity. However, any display in the form of graffiti and civic messages published by the Municipal Councils, Nagar Pachayats or any Government Authorities (having no commercial Exploitation) for the benefit of the Citizen shall not be considered as an advertisement.

(b) **Advertisement on balloons** means advertisement on hot air balloons which are filled with gas and floats in the air.

(c) **Advertisement on vehicle (Movable)** means single, double or multiple advertisement board affixed by means of sticker/boards on vehicle, side panel or behind a vehicles in a manners that advertisement draw visibility while the vehicle is driven on the road. However, care must be taken to ensure that this does not impede traffic as well as pedestrians.

(d) **Advertisement on vehicle (Parked)** means a single, double or multiple sided board panels mounted on side panel mounted on sides or behind a vehicle in a manner that can draw visibility when the vehicle is parked at strategic location. However, care must be taken to ensure that this does not impede traffic as well as pedestrians.

(e) **Agency** means an applicant who may be an individual, registered charitable organization, firm Government-semi Government Organization, partnership or a company incorporated under The Companies Act 1956.

(f) **Banner** means cloth or any other material, which contains some advertisement or announcement or written matter for display in public place.

(g) **Building** means a house, out house, stable, shed, hut, tank (except Tank for storage of drinking water in a building or part of building), and every other such structure, whether of masonry, bricks, wood, mud, metal or any other material what-so-ever.

(h) **Bus Shelter advertisement** means an advertisement displayed on the structure of a Bus Shelter It does not include cantilever, lollipop, etc.

(i) **Building wrap advertisement** means an advertisement display on the scaffolding of a building under construction or repair.

(j) **Cantilever** means a long bar supported/ fixed at one end and carrying load/ vertical support at the other end of long unsupported portion used to hold the structure (portion) erected on the divider of the road or the foot path/ pavement for display of road direction/ places or advertisement.

(k) **The Chief Officer** is as mentioned in The Maharashtra Municipal Council, Nagar Panchayats and Industrial Urban Act, 1965.

(l) **Competent Authority** means Chief Officer or an officer of the Municipal Councils, Nagar Panchayats duly authorized by the Chief Officer.

(m) **Dead wall** means a blank wall unbroken by windows or any other openings.

(n) **Councils** means the Municipal Councils established and constituted under the provisions of the Act;

(o) **Compound wall** means a wall erected at the edge of the plot boundary of the building/structure/open space/ other property.

(p) **Direction Boards** means any surface of structure erected on ground or any portion of roof of a building or on or above the parapet/ wall of any structure which indicate a direction to a road, building, park or any site and bounds put up by private and commercial establishments to indicate direction to their offices or commercial outlets, etc. Direction boards set up by Government or semi-government authorities will not require any kind of permission.

(q) **Electronic** Display means electronically operated advertisement display fixed on a structure LED /LCD/ Neon Sign, etc.

(r) **Gantry advertisement** means advertisement and affixed on gantry erected across a road and usually fabricated from metal section pillars fixed on either side of a road with a beam shaped section connecting the top of the pillars across the road with advertisement on the face opposite to the direction of traffic and which will not disturb pedestrians.

(s) **Glass Facade advertisement** means any advertisement which is affixed or pasted to the glass facade of any building structure.

(t) **Glow sign box advertisement** means an advertisement displayed on a transparent or translucent sheet of any material mounted on a metal sheet box, illuminated from behind using electrical lamps.

(u) **Graffiti** means painting on wall.

(v) **Ground rent** means rent paid under the terms of a lease/ tenancy by the occupier of building/land to the owner of land on which it is used for any purpose by the occupant.

(w) **Hoarding** means any structure erected on Land, Space around the building, Terrace, Parapet on dead wall with characters, letters or illustrations applied thereto and displayed in any manner whatsoever, out of doors, for purpose of advertising or to give information with a view to attract the

public to any place, persons, public performance articles of merchandise whatsoever and also include advertisement by using neon bulbs/ lamps/ lights, which flash and appear in synchronized manner in one or more different colors and also cutouts with LED lights.

(x) **Kiosk** means a small structure in a public area used for providing information or displaying advertisement, often incorporating an interactive display screen or screens.

(y) **Land** means land which is being built upon or is built upon or covered with water (benefits to arise out of land, things attached to the earth or permanently fastened to anything attached to the earth and rights created by legislative enactment over any street).

(z) **Laser advertisement** means advertisement displayed on surface of the premises/ screen by using laser projector.

(aa) **License** means the documented by the Competent Authority and erect a sky sign advertisement within the provisions of these guidelines.

(ab) **License Fees** refers to an amount of money paid by an business to a government agency for the privilege of performing a certain service or engaging in a certain line of business.

(ac) **Lollypop** mean round /square piece of advertisement board at the end of the pole erected from ground.

(ad) **Owner** when used in reference to any premises, meats the person who receives the rent of said premises or who would be entitled to receive the rent thereof, if the premises ware let and include :-

i. Agent or trustee who receive such rent on account of owner.
ii. Agent or trustee who receive such rent on account of or is entrusted with or concerned for any premises devoted to religious or charitable purpose; and
iii. A receiver, sequester, or manager appointed by any Hon'ble court of competent Jurisdiction to have the charge of or to exercise the rights of an owner of the said premises.
iv. In case of Co-operative society, a General Body of the society.

(ae) **Permit** means written permission of The Chief Officer (or any officer authorized by Chief officer) to erect, fix or retain any sky sign.

(af) **Premises** means buildings and lands of any tenure whether open or enclosed, whether built on or not and whether public or private.

(ag) **Prescribed Application Form** means a formal prescribe by the Commissioner at Appendix -A on which an application for permission to erect and display of any advertisement is to be made to the Councils.

(ah) **Private Street** means a street, which is not a Public Street.

(ai) **Public Street** means any street heretofore leveled, paved, metaled, channeled, severed or repaired by the Councils or any street which became Public Street under any of the provision of the Maharashtra Municipal Council, Nagar Panchayats and Industrial Urban Act, 1965 or which vests in the Councils as Public Street.

(aj) **Rooftop** means the structure having roof of Mangalore Tiles, asbestoses/ metal sheets or any other material sloping roof of the structure.

(ak) **Scroller Display Advertisement** means a box type display with rollers for scrolling a display of looped printed sheet which displays advertisements (Illuminated or Non illuminated)

(al) **Seaward Side** means the direction or side away from land and toward the open sea.

(am) **Show Case Advertisement** means a case covered from three sided and visible from any street, used for display of advertisements.

(an) **Sponsor** means a person who sponsors the advertisement either by payment or without any commercial exploitation.

(ao)**Stop line** means the line at which the traffic must stop before crossing the junction at signal intersection. Usually this is a solid line painted parallel to the Zebra Crossing.

(ap) **Sky-Sign** means any word, letter, model, sign, device or representation in the nature of an advertisement, announcement or directions supported on or attached to any post, poles, standard framework or other support wholly or in part upon or over any land, building, surrounding the open space of building, terrace, parapet or structure which, or any part of which sky sign, is visible against the sky from some point in any street and includes all and every part of any such post, pole (s) Standard frame work or other support. The expression "sky-sign" shall also include any balloon, parachute, or other similar device employed wholly or in part for the purposes of any advertisement, announcement or directions or over any street but shall not include:

i. Any flag staff, pole, vane or weathercock, unless adopted or used only or in part for the purpose of any advertisement, announcement or direction.
ii. Any word, letter, model, sign, device or representation as aforesaid relating exclusively to the business of a railway company and placed wholly upon or over a railway, railway station, yard, platform or station approach belonging to a railway company, and so placed that it cannot fall into any street or public place.
iii. Any notice of land or building to be sold, or let, placed upon such land or buildings.

(aq) **Temporary Arches** means temporary structures erected across the road for greeting of personalities or for display of advertisement.

(ar) **Terrace** means the flat roof of a house, building, open to sky portion of the constructed place having rooftop.

(as) **Traffic Island** means a traffic island which is a solid or painted object on a road that channels traffic. It can also be a narrow strip of island between roads that intersect at an acute angle.

(at) Traffic Island Watch Tower means a tower/ structure created for the use of safety and security of the public and smooth movement of traffic.

(av) **Tri-Vision Advertisement (or 'Tri-Ads')** means an advertisement hoardings/ board that use rotating triangular panels in a synchronized manner such that the three faces of the triangular section are seen one after the other displaying three different advertising messages.

(au) Vehicle shall include Auto motor cars, and every wheeled conveyance which is used or capable of being used on a public street.

(aw) **Wall painting Advertisement** means an advertisement displayed by painting it directly on the wall or structure of a building or any civil structure.

(ax) **Advertisement On Bicycle** means advertisement displayed on Bicycles.

(ay) **Chowk, Center Point Or Intersection Of Chowk** means the place where two or more roads intersects each other, on the main road where a stop line is defined for smooth flow of traffic.

(2) The words and expressions used but not defined herein shall have the respective meaning as assigned to them under the Act.

**3. New Permission for erection of new advertisement :-** (1) No agency, without permission in writing from the Competent Authority, shall erect, exhibit, fix, retain or display any advertisement by means of hoarding, posters, sky signs, kiosks, wall paintings, wall stickers, balloons etc. Such permission shall not be granted, unless fulfilling all the norms and the provisions mentioned in these guidelines and the provisions contained in the Act in this regards.

(2) (a) Subject to the provisions of section 79 of the Act, and these guidelines, Councils shall permit advertisement by various means mentioned in sub-rule (1) on Municipal lands by inviting tenders. Such matter all previous advertising licenses will need to be considered according to the approval / approval period. In case of approval level as well as previous working licenses, action should be taken as per previous guidelines. However, newly received proposals should be acted upon in accordance with these guidelines. These guidelines will not apply retrospectively.

(b) The Chief Officer should take a decision in consultation with the Councils regarding the existing agreement or the existing license within a period of 5 years from the date on which these guidelines come into force.

(3)(a) Any other Agency desirous the display of advertisement or erect the hoardings on their land or premises shall have to obtain a valid license from the competent authority as per the provisions contained in these guidelines and under the relevant sections of the Act.

(b) The competent authority while granting such license shall take into account the provision as mentioned in these guidelines.

(4) Permissions and license for advertisement shall not ordinarily be refused if they are in conformity with these guidelines, and are put up from the surroundings at the buildings unless if the same abstracts the light or ventilation or obstructions to the residents around or if the residents are not obstructed for movement of vehicles and parking of the same building/ premises. The competent authority, may give reasons to be recorded in writing, in case of refusing the permission for advertisement.

(5) If the hoarding is not erected within 3 months, the permission granted shall stand revoked or cancelled. However, any agency including applicant herein may apply a fresh by adopting the procedure laid down in this behalf.

(6) If a structure is found erected for purpose of the display of advertisement or a hoarding is erected or advertisement displayed without valid license, such hoarding or advertisement shall be liable to be removed without a notice to the agency and the agency shall also be liable to pay penalty as prescribed by the Councils from time to time.

(7) The competent authority may, in his own discretion, and by an order in writing, regularize the installation of any boarding that may have been installed without permission, by charging a

compounding fee five times of chargeable fee provided such hoarding or advertisement is in accordance with the provisions of these guidelines:

(8) Advertising Panel with proper ad widening usage, the panel may be erected at that place with the permission of the competent type. Competent community producers will be fruitful, rearranging or replacing their hoarding. The applicant/agency will not claim any damages. The following advertisements by the competent authority regarding the permission to replace the panel. Transfer can be granted after fulfillment of required documents and if no case is pending in any court. The advertiser will be responsible for the cost of moving the boards.

(9) The new guidelines will not apply retrospectively.

**4. Advertisement for which no permission is required: -** The following types of advertisements excluding illuminated advertisements and sky-signs, are not required to obtain permission from Competent authority:-

(a) Advertisements displayed within premises not visible from the road.

(b) Advertisement relating to business of the railways, state transport and displayed within railways, state transport premises, but not in front of any road.

(c) Advertisements displayed on or upon business premises relating to trade or business carried on within the premises.

(d) Advertisements displayed on or upon any premises relating to the sale or letting of the premises or of any effects therein.

5. **Restriction for display of the hoarding or advertisement:-**

(a) No illuminated hoarding or advertisement shall be permitted having high intensity focusing on the eyes of the driver.

(b) No hoarding shall be permitted at intersection within a distance of 25 meters, in front or ahead of the stop-line of its approach road that is facing the visibility of hoarding's display erected from ground level.

(c) No hoarding or advertisement shall be permitted in the public open space which includes public recreation grounds, playgrounds, parks and gardens etc.

(d) No mobile hoarding or advertisement will be permitted on any public road.

(e) No hoarding or advertisement shall be permitted on buildings of archaeological, historical, architectural, aesthetical, inherited and heritage importance.

(f) No hoarding or advertisement shall be permitted in briver bed, lakes, canals and water bodies.

(g) No hoarding or advertisement shall be permitted inside mangroves, creek or sea of High Tide Line (HTL). (As per CRZ guidelines)

(h) No hoarding or advertisement shall be permitted on the floor/terrace/parapet of the building.

(i) In case of illuminated or neon sign hoardings or advertisement, following restrictions should be observed:-

(i) The level of luminance should not exceed a source limit of 1 cd/cm square. Illumination shall not be continued after 11.00 pm.

(ii) The neon-signs in residential premises should not be flickering.

(iii) Neon-signs should be put off by 11:00 p.m.

(iv) No video or moving digital advertisements will be allowed. LED displays etc. should be still only. Changing of images after minimum 10 seconds will only be permissible.

(v) LED display panels should not be allowed to be erected without the permission of the Department of Electricity (Maharashtra State Electricity Department) and the concerned Traffic Police Department.

(j) No hoarding shall be permitted around Traffic Islands and signal junctions within a distance of 25 meters, in front ahead of the stop-line of its approach road that is facing the visibility of hoarding's display erected from ground level.

(k) Advertising boards (hoardings) will not be allowed if there are complaints from residents that they may interfere with the lighting or ventilation.

(l) No hoardings or advertisement shall be permitted on the walls other than dead walls of any building except wrap up neon or digital advertisements, subject to other provisions of these guidelines and the Act.

(m) No diesel generators sets will be allowed to illuminate hoardings or advertisement as these create noise and air pollutions.

(n) No hoardings or advertisement shall be erected to a height exceeding 30 feet above the road level of the road from where the advertisement hoarding is visible.

(0) There shall be no hoarding or advertisement on footpath or Public rood.

(p) No hoarding or advertisement shall be projected on a public road where there is no footpath.

(q) No hoardings or advertisement shall be permitted one above another which are not in accordance with the provisions of these guidelines.

(r) Display of advertisement by means of wall painting shall not be permitted.

(s) Clubbing of the hoardings or advertisement shall not be allowed which are not in accordance with the provisions of these guidelines.

(t) Hoardings or advertisement shall also not be permitted in the following conditions:-

(i) Any hoarding or advertisement erected in such manner and at such places, which will cause obstruction or interference with the visibility of approaching, merging, or intersecting traffic.

(ii) The hoarding or advertisement which would obstruct the vision of the sea, sunrise or sunset from a location designated for such vision.

(iii) The building, which does not have structural stability certificate.

(iv) The building, where action under the Act or under the Maharashtra Regional and Town Planning Act, 1966 is pending either at Municipal Council level or in a court of law or the owner of the building has been issued with a stop work notice under the said Acts.

(V) The building, which has been declared dangerous (partly or fully) or has been issued with a notice under the Act.

